

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ५५ । अंक ११ । ऑगस्ट २००२



राष्ट्रांची श्रीमंती आणि गरिबी







अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५५ । अंक ११ । ऑगस्ट २००२
आषाढ-श्रावण, शके १९२४
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-





## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)








# नवभारत

## अ नु क्र म

# राष्ट्रांची श्रीमंती आणि गरिबी

**श्री.मा. भावे**

**उपोद्‌घात**

(अ) प्रा. डेव्हिड एस. लँडेस हे अमेरिकेतील हार्वर्ड या विख्यात विद्यापीठात इतिहास व अर्थशास्त्र या विषयाचे सन्माननीय प्राध्यापक आहेत. त्यांनी विस्तृत अभ्यास करून 'द वेल्थ ॲण्ड पॉव्हर्टी ऑफ नेशन्स' या नावाचे पुस्तक १९९८ साली सिद्ध केले व ते इंग्लंडमध्ये 'लिटल ब्राऊन ॲण्ड कंपनी' या संस्थेने त्याच वर्षी प्रसिद्ध केले. त्याची त्या एकाच वर्षात सहा पुनर्मुद्रणे झाली. या लेखमालेद्वारे त्या पुस्तकाचा संक्षिप्त परिचय करून देण्याचे योजिले आहे.

साऱ्या जगाची निरनिराळ्या क्षेत्रांत प्रगती होत आहे, हा रोजच्या अनुभवाचा विषय आहे. शंभर - दोनशे वर्षांपूर्वी अत्यंत श्रीमंत माणसालाही ज्या सुखसोयी माहीत नव्हत्या त्या आता अनेक समाजांतून अगदी सामान्य माणसालाही उपलब्ध झाल्या आहेत. अवघ्या शंभर वर्षांपूर्वी आज ज्यांना समृद्ध देश म्हणून ओळखले जाते अशा देशांतूनही रोगांच्या साथी येत व हजारो माणसे मरत. कारण स्वच्छ पाणी आणि घाणीची झपाट्याने विल्हेवाट या सोयी नव्हत्या. युरोप व अमेरिकेतील लोक लोकरीचे कपडे वापरीत. ते कपडे रोज धुता येत नसत. त्यामुळे नायटे, गजकर्ण असे आजार होत. रोज अंघोळ करत नसत. त्यामुळे हात-पाय अस्वच्छ राहात. त्यातून जंतू पोटात जात व आमांश, अतिसार असे रोग होत. आता कापसाचे स्वच्छ कपडे आले, पाणी शुद्ध करण्याची साधने आली, लोक रोज अंघोळ करून राहू लागले, कपडे धुऊ लागले, स्वस्त साबण आले. या उपयांमुळे लोकांचे आरोग्य वाढले, ते दीर्घ काळ जगू लागले, हे सर्वांना समजते आहे.

आरोग्य व औषधे स्वस्तात व सहज मिळण्याचे कारण ज्ञान व विज्ञान यांचा उत्पादनाकडे होणारा विनियोग हे आहे. आज मनुष्य-जातीसमोर कितीही निकट समस्या उभ्या असल्या तरी त्यावर आपण मात करू शकू, हा विश्वास वाटण्याचे कारण विज्ञान व तंत्रज्ञानाची वाढ हे आहे. मनुष्यजातीपैकी काही समाज तर अमरत्व व त्याच्याही पुढची पायरी जे अजरत्व त्यांची स्वप्ने पाहात आहेत.

(आ) हे सर्वसामान्यच आहे की जगातील संपत्ती सर्व राष्ट्रांत सारख्या प्रमाणात वाटलेली नाही. निरनिराळ्या राष्ट्रांत विषमता आहे आणि ती वाढते आहे. काही समाज असे आहेत की त्यांना लठ्ठपणावर औषधे शोधण्यासाठी पैसा खर्च करावा लागत आहे; काही असे आहेत की, केवळ पोटापुरते अन्न त्यांना मिळते आहे व बहुतेक समाजात तर उद्याच्या जेवणाची चिंता आहे. श्रीमंत देशांतील लोकांची काळजी म्हातारपण सुखात कसे जाईल, ही आहे तर बाकीच्या देशांत लोक पन्नाशीच्या वर जगत नाहीत.

गेल्या दोनशे वर्षांत श्रीमंत व गरीब यांच्यातील तफावत वाढतेच आहे. आज स्वित्झर्लंड व मोझांबिक यांच्यांतील दर-डोई उत्पादनाचे गुणोत्तर ४०० : १ असे आहे. दोनशे वर्षांपूर्वी युरोपातील श्रीमंत राष्ट्रांचे उत्पन्न भारताच्या दरडोई उत्पन्नाच्या दीडपट किंवा दुप्पटच होते. सध्या तर श्रीमंत राष्ट्रे अधिक श्रीमंत होत आहेत आणि गरीब राष्ट्रे अधिक गरीब होत आहेत. हे टोकावरील राष्ट्रांच्या बाबतीत ढळढळीत खरे आहे. अधे-मधे असणारी राष्ट्रे आहेत तिथे राहण्यासाठीच आटापिटा करत आहेत.

(इ) स्वार्थासाठी का होईना, पण गरीब देशांची परिस्थिती सुधारावी म्हणून श्रीमंत देशांनी गरीब देशांना मदत केली पाहिजे. नाही तर ही गरीब राष्ट्रे श्रीमंत राष्ट्रांना लुबाडतील. इतर काही न जमले तर या देशातील लोकांच्या टोळ्याच्या टोळ्या श्रीमंत देशांत येऊन राहतील. संपत्ती ही लोकांना ओढून आणणारी आहे तर गरिबी साथीसारखी आहे. ती फैलावते. गरिबीला एका ठिकाणी कोंडून किंवा डांबून ठेवता येत नाही.

श्रीमंत राष्ट्रे गरिबांना कधी मदत करू शकतील याचा मार्ग सुचवावा असा हेतू धरून प्रा. लँडेस यांनी हे पुस्तक लिहिले आहे. हा प्रश्न अवघड आहे आणि त्याचे नक्की उत्तर देता येणार नाही. पण इतिहासाचा आढावा घेऊन राष्ट्रे श्रीमंत किंवा गरीब कशी होतात हे ठरवण्याचा प्रा. लँडेस यांचा प्रयत्न आहे. आज जगाच्या प्रगतीचा लगाम पाश्चात्त्य राष्ट्रांच्या







अनुक्रमणिका

हातांत आहे. हे का व कसे झाले? काही अभ्यासक म्हणतात की, पाश्चात्त्य लोक हुशार व कष्टाळू होते, संघटित होते व पौर्वात्य समाज आळशी, अंधश्रद्धाळू व मागास होते. काही इतिहासकार सांगतात की, पाश्चात्त्य समाज आक्रमक, हावरट, निर्दय व लबाड होते. पोर्वात्य समाज हे स्वसंतुष्ट आणि भोळे असल्याने पाश्चात्त्यांच्या आक्रमणाचे बळी झाले. लँडेस सांगतात की, या दोन्ही मतांत सत्याचा अंश असला तरी फार मोठा भाग दुराग्रह व कल्पनाविलास यांचाही आहे. वस्तुस्थिती फारच गुंतागुंतीची आहे.

तिसरा दृष्टिकोन असा आहे की, इतिहासाच्या राहाटावर काही गाडगी खाली जातात, काही वर येतात. सध्या पाश्चात्त्यांच्या उत्कर्षाचे दिवस आहेत. पण हेही खरे नाही. पाश्चात्त्य समाज प्रगतीच्या अग्रभागी पोचले, ते केवळ दैवयोगाने नव्हेत. गेली हजार वर्षे इतिहासाचा प्रवाह पाश्चात्त्यांनी खणलेल्या पात्रातून वाहतो आहे. ही पाश्चात्त्यप्रधानता कोणाला आवडो वा न आवडो, ती नाकारता येत नाही. पाश्चात्त्यांच्या भरभराटीला साम्राज्य व इतरांची पिळणूक यांचा हातभार लागला, हे खोटे नाही; पण इतर अनेक सांस्कृतिक व सामाजिक घटक त्याला कारणीभूत झाले, हेदेखील खरे आहे.

**देणे निसर्गाचे**

(अ) आजच्या घटकेला पाहिले तर असे आढळते की, गरीब व मागास राष्ट्रे कर्कवृत्त व मकरवृत्त यांच्यामधील प्रदेशात असून श्रीमंत राष्ट्रे त्या पट्ट्याच्या बाहेर आहेत. थोडक्यात, उष्ण हवामानाच्या प्रदेशात दारिद्र्य असून समशीतोष्ण किंवा थंड भागात श्रीमंती आहे. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला भूगोलाचे अभ्यासक या निरीक्षणावर जोर देऊन असे सांगत असत की, उष्ण प्रदेशातील लोक आळशी, मठ्ठ व दुबळे असल्याने या भागातील लोक कायमच अप्रगत राहणार व थंड वातावरणातील लोक चळवळे, बुद्धिमान व ताकदवान असल्याने वरचढ ठरणार. हा वांशिक दृष्टिकोन दुसऱ्या महायुद्धानंतर मागे पडला आणि उष्ण हवामानातील समाजांच्या मागासलेपणाला निसर्ग हे कारण नसून इतर कारणे आहेत, असे हिरिरीने सांगितले जाऊ लागले.

लँडेस यांचे असे मत आहे की, राष्ट्रे श्रीमंत होण्यासाठी तंत्रज्ञान व विज्ञान यांचा उपयोग निर्णायक ठरतो, हे निर्विवाद असले तरी समाजाच्या प्राथमिक अवस्थेत निसर्गाच्या कृपेच्या व अवकृपेच्या फटक्यांनी संस्कृतीच्या घडणीवर टिकाऊ परिणाम झालेला असतो. म्हणून श्रीमंती-गरिबीचा विचार करताना निसर्गाच्या प्रसाराची दखल घेणे जरूरीचे आहे.

(आ) उष्ण प्रदेशात काम करताना मनुष्याला ऊर्जेचा जास्त वापर करावा लागतो. उष्णता दूर ठेवण्यासाठी त्याला घाण गाळावा लागतो. त्यामुळे उष्ण प्रदेशाची मनुष्याची कार्यक्षमता कमी पडते. या भागात किटाणू, जीवजंतू, प्राणी, वनस्पती यांची भरघोस वाढ होते. त्यात उपयोगी जीवजंतू असतात तसे घातक किटाणूही असतात. त्यामुळे आरोग्य बिघडते, मोठ्या साथी येतात, पिकांवर रोग पडतात, पाळीव जनावरे आजारी होतात. या भागात पाऊस विशिष्ट ऋतूत व जोराचा पडतो. त्यामुळे वर्षांतून एकच पीक घेता येते, वर्षभर पाण्याचा पुरवठा होत नाही. जोराच्या पावसामुळे धूप होते व पाणी वाहून जाते. विस्तृत क्षेत्र लागवडीखाली आणावे लागते आणि एकाच वेळी खूप मजूर लागतात.

याचा परिणाम असा दिसतो की, या भागात रानतोड मोठ्या प्रमाणावर झाली. संस्कृतीच्या अगदी सुरुवातीच्या काळातच फार मोठी जमीन लागवडीस आणावी लागली. भरवशाचा पाणीपुरवठा होतो, म्हणून नद्यांच्या काठाने वस्ती वाढत गेली. नदीपासून दूरची जमीन पिकाखाली आणायची तर कालवे खणावे लागले. पाण्यावर ज्याचा कब्जा तो सर्वांवर वर्चस्व गाजवू लागला. मजुरांची चणचण भासत असल्याने लवकर व अनेक लग्ने करून मुलांची पैदास वाढवणे ही प्रथा पडून गेली.

उष्ण भागातील समाजांनी शेती लवकर अमलात आणली. त्यामुळे नागर संस्कृतीही इकडे जुन्या काळातच निर्माण झाली. उच्च-नीचत्व, गुलामी, वेठबिगारी या समाजात जुन्या काळापासून रुजल्या. ईजिप्तमधील पिरॅमिड्स, चीनची भिंत अशी अजस्र बांधकामे गुलामगिरी व वेठबिगारी यांच्यामुळेच शक्य झाली. लोकसंख्या फार वाढली. चीनमध्ये फार जुन्या काळापासून घनदाट लोकवस्ती आहे. लोकसंख्या वाढली की समाज आणखी विस्तृत भागावर पसरतो व आणखी जमिनीवर शेती करू लागतो.

(इ) वायव्य युरोपातली स्थिती निराळी होती. प्रदेश थंड हवेचा आणि पाऊस वर्षभर रिमझिम पडतो. पण इथली थंडी पूर्व युरोपातील थंडीसारखी असह्य नाही. कारण, ॲटलांटिक समुद्रातील उष्ण प्रवाह येथील किनाऱ्याच्या जवळून वाहतात.

अनुक्रमणिका







येथील थंडीत घातक जीवजंतू फार काळ जगत नाहीत आणि मनुष्याला काम करायला उत्साह राहतो. थंडीचे निवारण करण्याला लोकरीचे कपडे हे सुलभ साधन आहे. पण उष्णतेचा मुकाबला इतक्या सोप्या रीतीने होत नाही. इथला पाऊस जमिनीतील ओलावा टिकवून ठेवतो आणि जमिनीची धूप करत नाही.

याचे परिणामही सहज समजून येणारे आहेत. फार थोडी जमीन शेतीखाली आणावी लागली. वस्ती नद्यांच्या आश्रयाने न पसरता इतरत्रही पसरली. मोठ्या प्रमाणात कुरणे व राने टिकून राहिल्याने समजावर नागरी संस्कार दमा-दमाने झाले. संस्कृतीची उभारणी होण्यासदेखील बराच काळ जावा लागला. शेतमजुरांची निकड नसल्याने लग्ने उशिरा होत व मुलेही थोडी असली तरी काम भागे. वस्तीची वाढ झपाट्याने झाली नाही आणि जंगलतोडही झाली नाही. गोपालन, अजापालन यांच्या वरच समाजाचा निर्वाह होत राहिला.

याचेही काही परिणाम झाले. प्राणिज-प्रथिने खाण्यात आल्याने माणसे धिप्पाड व कार्यक्षम झाली. जनावरेही थोराड व चपळ झाली. पश्चिम युरोप अरबांच्या आक्रमणाला तोंड देऊ शकला याचे कारण युरोपातील घोडे थोराड, वळकट व चपळ होते. उलट, भारतात घोडेच नव्हते आणि परदेशांतून आणून वाढवलेले घोडे चपळ व ताकदवान नव्हते. त्यामुळे मध्यपूर्वेकडून झालेल्या आक्रमणांना भारतीय राज्ये तोंड देऊ शकली नाहीत. चिलखत घातलेला घोडेस्वार व घोडा मिळून एक रणगाडाच तयार होत असे. ते पूर्वेकडील घोड्यांना झेपले नसते.

सारांश, संस्कृतीच्या आरंभकाळात आणि विज्ञान व तंत्रज्ञान यांचा उदय होण्यापूर्वी समाजाच्या धारणीवर व उत्कर्षावर भौगोलिक परिस्थितीचा अमिट ठसा उमटला. त्याचे महत्त्व तारतम्याने समजून घेतले पाहिजे.

(ई) या संबंधात लँडेस यांनी चीनचे उदाहरण दिले आहे ते असे : इसवी सनाच्या सुरुवातीला चीनच्या उत्तर टोकाला सहा कोटी लोकसंख्या असलेला एक समाज होता. इ.स. १००० पर्यंत ही लोकसंख्या तितकीच राहिली. नंतरच्या तीनशे वर्षांत लोकसंख्या दुप्पट झाली. त्यानंतर पूर्व युरोप व मध्य आशिया इकडून आलेल्या साथींमुळे लोकसंख्या आठ कोटीपर्यंत खाली आली. इ.स. १६५० च्या सुमाराला ही लोकसंख्या १५ कोटी झाली. १७५० साली २५ कोटी झाली. १८०० साली ती ३० कोटी, १८५० साली ४० कोटी, १९५० साली ६५ कोटी अशी वाढत आता लोकसंख्या १२० कोटी आहे. लवकर होणारी लग्ने व पुष्कळ मुले हवीत हा हट्ट यांच्या मुळे लोकसंख्या अशी वाढली. माणसांना अन्न लागते व अन्नासाठी माणसे लागतात, हे चक्र अव्याहत चालू आहे.

आशियाई गवताळ प्रदेशातील मेंढपाळांनी शेती करून स्थिर राहण्याचा निर्णय घेतला, तेव्हापासून हे चक्र चालले आहे. मनुष्यसंख्या, अन्न व सत्ता यांच्यातील नाते या समाजातील सत्ताधीशांनी फार लवकर ओळखले. माणसांना जमीन वाटून द्यायची; सैन्यासाठी धान्याची कोठारे भरून ठेवायची; सत्तेच्या केंद्रांना धान्यपुरवठा होत राहील याची तरतुद राखायची या तीन सूत्रांवर येथील राज्ये चालत. चीनच्या इतिहासकारांनी लिहिले आहे की, "दांडगे सैन्य आणि अन्नाची चंगळ यांच्या आधारावर राज्य उभे राहते. 'चिन्' या राजाच्या नोकरांनी शेतीकडे लक्ष देऊन साम्राज्य उभे केले. पश्चिमेकडील प्रदेश कब्जात आणण्यासाठी 'सियाओ-बू' याने लष्करी छावण्या त्या भागात ठेवल्या. आपल्या पूर्वजांनी हा चांगला कित्ता घालून दिला आहे."

आणखी धान्यासाठी आणखी जमीन व नव्या जमिनीसाठी जास्त मजूर! खा-खा इतकी वाढली की, इ.स. ४५० च्या सुमाराला सरकारने प्रत्येकावर शेतकामाची सक्ती केली. प्रत्येक कुटुंबाला बैल दिले आणि बदल्यात विना - मजुरी काम करून घेतले. कुटुंबाने किती पीक काढले याची नोंद ठेवली. कोणीही दारू प्यायची नाही, नाटक-तमाशे पाहायचे नाहीत आणि शेती सोडून इतर उद्योग करायचे नाहीत, असा बंदोबस्त केला.

### युरोपचे वेगळेपण

(अ) इ.स. च्या १००० सालच्या युरोपची स्थिती पाहून कुणालाही असे वाटले नसते की, येत्या पाचशे वर्षांत या भागाचा मोठा उत्कर्ष होणार आहे. इ.स. १००० च्या सुमाराला रोमन साम्राज्याचा शेवट झाला आणि युरोपभर रानटी टोळ्यांची आक्रमणे होऊ लागली. स्कँडिनेव्हिया भागातील व्हायकिंग्ज, आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावरून आला आणि पूर्वेकडून माग्मार टोळ्या युरोपातील सुसंस्कृत भागावर धाडी घालीत होत्या आणि लुटालूट करीत होत्या. या आक्रमणांना तोंड द्यायला शक्तिशाली मध्यवर्ती सत्ता उरलीच नव्हती. सर्वत्र लहान व






मध्यम दर्जाचे जमीनदार किल्ले बांधून व आसपासची पंचक्रोशी ताब्यात आणून राहात होते. जमीनदारांपैकी जेवढा भाग या सरदाराच्या मालकीचा असे त्यावर त्याचे गुलाम (सर्फ) राबत आणि उरलेल्या भागात स्वतंत्र शेतकरी, जमीनदाराला कर देऊन नांदत. मध्यवर्ती राजसत्ता जरी उरली नव्हती, तरी युरोपभर सांस्कृतिक, शैक्षणिक व धार्मिक अंगांवर अंमल गाजवणारे एककेंद्री चर्च मात्र शाबूत होते.

तथापि नंतरच्या दोनशे वर्षात हे टोळीवाल्यांचे धावे बंद झाले. एक म्हणजे, राजसत्तेच्या कुमकेची वाट न पाहता ठिकठिकाणची जनताच या टोळीवाल्यांच्या विरोधात उभी राहू लागली. व्हायकिंग्जना खेड्यात येऊ देऊन कोंडीत पकडायचे व नंतर त्यांना चोपून काढायचे हे तंत्र जनतेने अवलंबले. माग्मारांचा लुटीसाठी येतानाचा झपाटा जबरदस्त तरी लूट घेऊन परत जाताना त्यांना सुस्ती येई. अशा वेळी आसपासची प्रजा त्यांच्यावर झडप घालून त्यांना पिटून काढी. अरबांची रीत अशी होती की, ते व्यापाऱ्यांच्या काफल्यांवर दरोडे घालीत. या वाटमारीला तोंड देण्यासाठी व्यापारी एकत्र येऊन तांड्यावरोवर सशस्त्र दले संरक्षणासाठी पाठवू लागले. दुसरे असेही झाले की, माग्मार आणि व्हायकिंग टोळ्या सुसंस्कृत लोकांच्या सहवासात येऊन थोडे स्थिरावले व त्यांनीही आपली गावे वसविली.

(आ) अशी थोडी स्वस्थता लाभल्यावर युरोपातील लोकांचा मूळ उद्योगी समाज उफाळून वर आला. त्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक परंपरेतील काही घटकांमुळे त्यांच्या उद्योजकतेला उपकारक वळण मिळाले; आणि नंतरच्या तीन शतकांत युरोपातील समृद्धी वाढली.

आर्थिक विकासाला उपकारक अशी पहिली संस्था म्हणजे खाजगी मालमत्तेला संरक्षण देणारे व्यक्तिनिरपेक्ष कायदेकानू ही होय. तुमची शेतीवाडी, दौलत व मिळकत यांचे अस्तित्व राजसत्तेच्या लहरीवर अवलंबून राहणार असेल, तर मनुष्याला श्रम करण्यासाठी हुरूपच राहणार नाही. ज्यू व ख्रिश्चन परंपरा अशी होती की, सत्ताधारी प्रजेच्या खाजगी मालमत्तेला हात लावू शकत नसे. त्यामुळे कुणाची संपत्ती सरकारने जप्त केली आहे, असा प्रकार होत नव्हता. युरोपच्या परंपरेतील दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे शहरांना असलेली स्वायत्तता. शहर ज्या राज्याच्या टापूत असे, त्या राज्याला शहरवासी कर देत. पण शहराच्या दैनंदिन कारभारावर शहरवासीयांचे पूर्ण नियंत्रण असे; त्यात ढवळाढवळ करण्याचा अधिकार राज्याला नव्हता. त्यामुळे शहरी प्रजेला निराळे आत्मभान व अभिमान वाटत असे आणि कसबी कारागीर ग्रामीण भागातून शहरी भागात येऊन राहात.

तिसरा भाग असा की, सबंध युरोप आजच्या जिल्हा-दोन जिल्हे इतक्या आकाराच्या राज्यात विखुरलेले होते. त्यामुळे प्रत्येक राज्य कमकुवत असले व त्यांच्यातील झगड्यात प्रजेची पायमल्ली होत असली तरी त्यापासून काही फायदेही होत. पहिली गोष्ट अशी की, युरोपच्या वाहेरून होणाऱ्या आक्रमणाने एका फटक्यात सारा युरोप पादाक्रांत केला, असे होत नसे. युरोप बाहेरच्या साम्राज्यांकडे पहिले, तर असे दिसून येईल की, एकदोन लढायांत मट्टमास येऊन ही साम्राज्ये परक्यांच्या अमलाखाली जात. उदा. पर्शियन साम्राज्य, सासानियन साम्राज्य, इस्तंबूलचे रोमन साम्राज्य ही अरबांच्या आक्रमणापुढे टिकाव धरू शकली नाहीत व शत्रूच्या ताब्यात गेली. दुसरे, ही छोटी छोटी राज्ये आपसात चांगल्या अर्थाने स्पर्धाही करीत. आपल्या राज्यात उद्योग वाढावेत, कारागीर व कलावंत यावेत, मोठी शिल्पे व धंदे सुरु व्हावेत असे त्यांना वाटे. त्यामुळे गुणवंतांना उत्तेजन मिळे. राज्ये निराळी असली तरी समाज व संस्कृती एकच असल्याने माणसांचे दळणवळण चालत राही.

(इ) इ.स. १२०० ते १५०० या काळात युरोपात मोठे आर्थिक परिवर्तन घडून आले. परकीय आक्रमणांपासून मिळालेली उसंत, खाजगी मालमत्तेचा बहुतेक निर्वेध हक्क, शहरांची स्वायत्तता व तेथे कारागिरांना मिळणाऱ्या सवलती आणि तुटपुंजी पण स्थिरावलेली सत्ता यांच्या योगाने हे परिवर्तन झाले. अशा तऱ्हेची भरभराट यापूर्वी फक्त इ.स.पू. ८००० ते ३००० या काळात घडली होती. ही प्राचीन सुधारणा शेतीचा शोध, जनावरांना माणसाळण्याची प्राप्त झालेली हातोटी आणि भटकेपणा सोडून गावे वसवून राहण्याची सापडलेली सोय यांमुळे घडून आली होती. आर्थिक बदल घडून येण्यास ऊर्जेचा पुरवठा वाढावा लागतो. या प्राचीन बदलाच्या काळात अन्नाचा भरवसा वाटणारा पुरवठा, जनावरे व स्थिरावलेली वस्ती यामुळे ऊर्जेचा पुरवठा वाढला होता. पण यासाठी ५००० वर्षे लागली होती.

नवी आर्थिक सुधारणा अवघ्या ३०० वर्षांत घडून आली. यालाही कारण ऊर्जेचा वाढलेला पुरवठा हेच होते. पहिले





म्हणजे शेतीची सुधारलेली अवजारे. लोक लोखंडी व चाके लावलेले नांगर वापरू लागले. त्यामुळे मोठ्या शेतांवर लागवड करणे शक्य झाले. नवीन जमीन शेतीखाली आली. अन्नपुरवठा वाढला व लोकसंख्याही वाढली. तसेच वर्षात तीन-तीन पिके घेतल्याने पैदास तिप्पट झाली. अशा रीतीने ऊर्जेचा पुरवठा वाढला.

शहरांतून कारागिरांचे व उत्पादकांचे संघ (गिल्ड्स) तयार झाले. त्यामुळे सुरुवातीला उत्पादन सुसंघटित होऊन वाढले. पण नंतर या संघांनी स्पर्धा टाळण्यासाठी तपशिलवार नियम केले. कारखाना किती वेळ चालवावा, दुकाने केव्हा उघडावीत, नोकर किती ठेवावेत याविषयी केलेल्या या नियमांमुळे महत्त्वाकांक्षी आणि नव्याने धंदे काढणाऱ्या लोकांनी संघाच्या व शहराच्या बाहेर राहून उद्योग काढण्यास सुरुवात केली. उपनगरे वाढली. शहरातही नियम मोडण्याकडे कल वाढला व लाचलुचपतीला ऊत आला. बरकत सुरु झाली की या गोष्टी होतच असतात.

फ्रान्स, जर्मनी, इटली या प्रदेशांतून महत्त्वाचा उद्योग लोकर कातणे, कपडे विणणे हा होता. शहरी कामगार मालकाच्या घरी जाऊन मागावर हे काम करीत. पण जागेची टंचाई व केवढ्या जागेत किती कामगार असावेत याबद्दलचे नियम यांच्या कचाट्यातून सुटण्यासाठी घरीच कताई व विणकाम करावे अशी सवड काढण्यात आली. तेवढ्याने मागणी पुरी होईना तेव्हा खेड्यांतील मुले व स्त्रिया यांच्याकडे धंदेवाल्यांचे लक्ष गेले. हे घटक असे होते की, जे कशालाच नाही म्हणू शकत नव्हते. ज्या समाजातून आर्थिक भरभराट झाली त्या समाजात मुले व स्त्रिया यांची पिळवणूक झाली, हा इतिहास आहे. हा नवा कामगारवर्ग उपलब्ध झाल्यावर शहरी कामगारांचा रोजगार कमी झाला. तशी शहरी कामगारांनी मालकांना जबरदस्ती करून, कामे बाहेर द्यायची नाहीत, असा नियम केला. याबाबत स्पर्धक उद्योगपतींची साथही कामगारांना मिळाली. कित्येक ठिकाणी असेही झाले की, शहरी कामगारांनी झुंडींनी जमून खेड्यांवर हल्ले केले व तेथील माग बंद पाडले.

मध्ययुगातील युरोप अंधारात चाचपडत होते, हे म्हणणे खरे नाही. वर सांगितल्याप्रमाणे १३व्या शतकापासूनच उद्योग, संशोधन व ज्ञान या क्षेत्रांत नवीन उपक्रमशीलतेला वाव मिळू लागला होता. लोकसंख्या व समृद्धी या दोन्ही गोष्टी वाढत होत्या. व्यापाराला उपयोगी अशा नव्या सोयी लोक शोधून काढत होते. एकत्र येऊन भांडवलाची उभारणी करणे, नवीन बाजारपेठा वसवणे व त्या भरभराटीला आणणे, व्यापारी वहातुकीला एकत्र येऊन संरक्षण देणे या सुधारणातून व्यापाराला नवे रूप येत होते. वाढत्या बाजारपेठांमुळे नवीन उत्पादने व तंत्रज्ञान यांना प्रोत्साहन मिळत होते. कामाची विभागणी, त्यामुळे नेमून दिलेल्या कामात मिळणारे नैपुण्य व त्यातून उत्पादनात वाढ असे चक्र सुरु झाले होते.

### शोधांचा शोध

(अ) आज ज्याला आपण प्रबोधन-युग म्हणतो, ते अवतरण्या-पूर्वीच, म्हणजे मध्ययुगातच युरोपात अनेक महत्त्वाचे शोध लागले व त्यामुळे जगण्याची रहाटीच बदलून गेली. तेराव्या शतकाच्या शेवटाला व चौदाव्या शतकाच्या सुरुवातीला अनेक उपयुक्त गोष्टींचे शोध युरोपीयांनी लावले आणि इतर संस्कृतीत लागलेले शोध आत्मसात करून त्यात सुधारणा घालून आणल्या.

रोमन काळातच पाणचक्क्यांचा शोध लागला होता. परिघावर वाट्या बसवलेली चाके पाण्याच्या प्रवाहाच्या साहाय्याने फिरत ठेवायची व त्या गतीवर कामे करून घ्यायची हा पाणचक्कीचा उपयोग. दहाव्या व अकराव्या शतकातच युरोपने या यंत्राचा मोठ्या प्रमाणावर उपयोग केला होता. १०८६ साली एकट्या इंग्लंडमध्ये ५६०० पाणचक्क्या होत्या, अशी माहिती मिळते. एकाच प्रवाहात एका खाली एक तीन-चार ठिकाणी पाणचक्क्या ठेवायच्या. म्हणजे निरनिराळ्या गतीने फिरणारी चाके एकाच वेळी निरनिराळी कामे करतात. दळणे, लोकर बडवणे, धातूचे पातळ पत्रे किंवा तारा गुंडाळून घेणे, चिंध्या बडवून कागद करणे ही कामे पाणचक्कीकडून होत असत. कागद करण्याची कला चीनकडून अरबांच्या मार्फत युरोपात आली. पण कागद करण्यासाठी पाणचक्की वापरावी ही युक्ती युरोपीय लोकांनाच सापडली.

(आ) तेराव्या शतकाच्या अखेरीला चष्म्यांचा शोध युरोपात लागला. भिंगातून पाहिल्याने अक्षरे किंवा वस्तू मोठ्या दिसतात, हे पूर्वीपासून माहीत होते. पण चाळिशीनंतर जवळचे दिसेनासे होते व त्यासाठी चष्मे वापरावेत, ही गोष्ट नव्याने सुचली. लघुदृष्टी देणारे चष्मे बदलावे लागतात म्हणून त्या त्या तीव्रतेची भिंगे वापरण्याची कला लवकरच साध्य झाली. त्यामुळे कसबी कारागिरांचे काम करण्याचे आयुष्य एकदम दुप्पट झाले. चष्मा सापडण्यापूर्वी ग्रंथांच्या नकला करणारे लोक, सोनार व

नकसगीर, घड्याळे दुरुस्त करणारे, विणकर व मातकाम करणारे कसबी वयाच्या चाळिशीनंतर निकामी होत. आता ते ६०-६५ व्या वर्षापर्यंत कामे करू लागले.

भारत किंवा चीन येथेही सूक्ष्म काम करणारे कारागीर होते. त्यांना या कामात डोळ्यांचा उपयोग करावा लागत नसे. अशी कामे त्यांच्या अगदी अंगवळणी पडलेली असत. त्यामुळे चाळिशीनंतरही त्यांचा उद्योग चालत असे. मात्र इथे एक महत्त्वाचा फरक होता. भारतीय कारागीर उत्तम काम करत खरे पण ते हुबेहूब होत नसे. युरोपचे लक्ष आता मोठ्या प्रमाणावर व एकसारखे उत्पादन करण्याकडे लागलेले होते. भिंगाची ही जी माहिती समाजात पसरली होती. त्यामुळेच पुढे सूक्ष्मदर्शक यंत्र आणि दुर्बिणी यांचे शोध लागले. जवळ जवळ चारशे वर्षे चष्म्याचा उद्योग एकट्या युरोपातच चालत होता.

(इ) कालमापनासाठी छायायंत्र व घटिकायंत्र यांचा उपयोग बहुतेक सर्व समाजांत प्राचीन काळापासून चालत होता. पण छायायंत्रे, आसपासच्या उत्तरेकडील प्रदेशांत, जेथे सूर्यप्रकाश हमखास उपलब्ध आहे असेच नाही, तेथे उपयोगी नव्हती. घटिकायंत्रासाठी स्वच्छ पाणी लागे. एरवी छिद्रात गाळ पुढे अडकून घटिकायंत्र नेमकी वेळ दाखवत नसे. नेमक्या वेळेची गरज चर्चा त्यांच्या प्रार्थनांसाठी भासे. पुढे शहरातून सामूहिक उद्योग सुरु झाले, तेव्हा शहरांनाही कालमापकाची गरज भासू लागली. दुकाने उघडणे, कारखाना चालू करणे व काम थांबवणे, शाळा भरणे व सुटणे, वेशी बंद करणे ही कामे वेळेवर व्हावी लागत. अशा रीतीने 'वेळ साधणे' या गोष्टीला ऐहिक व्यवहारातही महत्त्व आले.

अशा काळात इटाली व इंग्लंड या दोन्ही देशांत यांत्रिकी कालमापकांचा म्हणजे घड्याळांचा शोध लागला. सुरुवातीला ही घड्याळे तकलादू होती व सारखी बंद पडत. त्यामुळे घड्याळ-मालकाला घड्याळजीही पदरी बाळगावे लागे. साहजिकच रईस लोकांतच घड्याळांचा प्रसार होता. पण या शोधाचे मूलगामी व दीर्घकालीन परिणाम झाले.

कालमापनाची मिरासदारी सुरुवातीला चर्चकडे होती. चर्चने दिवसाचे बारा तास व रात्रीचे बारा तास अशी विभागणी केली होती. ऋतुमानाप्रमाणे तासांची लांबी कमी-जास्त होत असे. यांत्रिकी घड्याळाला तासांचा हा लवचीकपणा सोयीचा नव्हता. शहरी प्रशासकांनी यांत्रिक घड्याळे स्वीकारली व चौका-चौकात घड्याळे बसविली. साहजिकच समाज व चर्च यांच्यात वेळेवरून झगडा सुरु झाला. जवळजवळ शंभर वर्षे चर्च आपल्या प्रघाताला चिकटून होते. त्यानंतर त्यांना समाजाचीच कालमापनपद्धती स्वीकारावी लागली.

काळ हा सतत (कंटिन्युअस) असतो तर यांत्रिक घड्याळ त्याचे सूक्ष्म का होईना, पण तुकडे करते. हा फरक तेराव्या शतकात विचारवंतांच्या लक्षात आला नसेल. पण सतत प्रक्रिया किंवा पदार्थ यांचे बारीक तुकडे पाडून ते समजावून घेणे यामुळे गोष्टी व विज्ञान यांना निराळीच कलाटणी मिळाली. घड्याळामुळे समाजात व्यवस्था व नियंत्रण यांना वेगळा अर्थ प्राप्त झाला. माणसे आपले व्यवहार कोणा बाह्य-नियंत्रणाला न जुमानता पण काळाचे भान ठेवून पार पाडू लागली. त्यामुळे उत्पादकता वाढली. किंबहुना उत्पादकता ही कल्पनाच मुळी घड्याळाशिवाय शक्य होत नाही. या बाबतीत शेतकरी व कामगार यांची तुलना करून पाहा. शेतकरी 'एक काम — त्यानंतर दुसरे' या पद्धतीने कामे करतो व तीही अनुकूलता असल्यास उलट कामगाराला मात्र विशिष्ट काळात 'अमुक इतके' उत्पादन द्यावेच लागते.

घड्याळधंद्यावरसुद्धा युरोपचाच एकाधिकार ४०० वर्षे राहिला. इतर समाजांना घड्याळाचे आकर्षण होते. युरोपीय व्यापारी भारतीय व चिनी राज्यकर्त्यांना घड्याळे आवर्जून भेट म्हणून देत. परंतु या समाजांना युरोपसारखी उत्कृष्ट घड्याळे बनवता आली नाहीत.

चीनकडे घड्याळे नव्हती असे नाही. हांग व सुंग राजवटीत सम्राटांनी पाण्याच्या प्रवाहावर चालणारी शोभिवंत घड्याळे तयार केली होती. पण नद्यांच्या पात्रात गाळ साठून प्रवाह मंदावला व घड्याळे मागे पडू लागली. चीनमध्ये घड्याळ हा पदार्थ कायम श्रीमंतांपुरताच मर्यादित राहिला. सामान्य जनतेचा घड्याळाशी संबंध आलाच नाही. शहरातून दर तासाला डांगोरा पिटून तास झाल्याची वर्दी दिली जाई. हा चिनी तास सध्याच्या तासाच्या दुप्पट लांबीचा होता. चीनमध्ये कॅलेंडरेही होती. पण कॅलेंडरला सरकारी मंजुरी लागे. दर राजवटीत कॅलेंडर बदले. चिनी तासांना आकडे दिलेले नसत; नावे दिली होती. त्यामुळे कालमापनाचा व गणिताचा संबंध राहिला नाही. पाश्चात्त्य घड्याळे आली तरी चिन्यांची कालमापनाची पद्धती बदलली नाही. पाश्चात्त्य घड्याळांचा उपयोग शोभेची वस्तू किंवा खेळणी म्हणूनच झाला. मुस्लिम संस्कृतीनेही पाणचक्कीवर

चालणारी घड्याळे वापरात आणली होती. नमाजाची वेळ साधायला त्यांचा उपयोग होई. परंतु ऐहिक व्यवहारात घड्याळाचा उपयोग झाला नाही. सार्वजनिक ठिकाणी घड्याळ बसवून जनतेचे व्यवहार वेळेबरहुकूम होतील अशी व्यवस्था त्यांनी केली नाही. उलट असे काही केले तर कालमापन सवंग होऊन बसेल अशी भीती वरच्या वर्गातील लोकांना वाटे.

(ई) छपाईचा व कागदाचा हे दोन्ही शोध चीनमध्येच लागले. पण चीनमध्ये पुस्तके तयार झाली नाहीत. एक कारण असे होते की, चिनी लिपी चित्रमय असल्याने मोठे ठसे करून कागदावर उमटवावे लागत. दुसरे म्हणजे छपाईवर सरकारचे नियंत्रण होते. चीनमध्ये छपाईचा शोध नवव्या शतकात लागला व ती कला युरोपात पोचायला ४०० वर्षे लागली. पण त्यापूर्वीच युरोपात साक्षरता व वाचनाची आवड या गोष्टी पुरेशा फैलावल्या होत्या. एकाच वेळी अनेक लेखक बसवून व त्यांना सांगवून (डिक्टेट करून) ग्रंथांच्या प्रती करीत. छपाईची कला आल्यावर प्रथम ठसा तयार करूनच छपाई होत होती. पण लवकरच खिळे जुळवून छपाईची युक्ती आली. युरोपीय लिपी मूळाक्षरांची बनलेली असल्याने ते शक्य झाले. १४५२-५५ या काळात गटेनबर्गने बायबल छापून काढले. अगदी अल्पावधीत पुस्तके लाखावारीने खपू लागली.

छपाईची कला अरबांच्या करवी युरोपात आली आणि उत्कर्षाला पोचली. पण मुसलमानांनी छपाईचा अंगीकार केला नाही. मुस्लिम धर्मगुरूंचा छपाईला विरोध होता आणि छापील कुराण ही कल्पनाच त्यांना असह्य वाटत होती. इस्तंबूल ही तुर्की साम्राज्याची राजधानी होती. तेथे छापखाने होते. पण ते सर्व ख्रिस्ती व ज्यू यांच्या मालकीचे होते. भारताची तीच स्थिती होती. गोव्यात पोर्तुगीजांचे छापखाने होते. ती पुस्तके ख्रिस्ती जनतेत वाचली जात होती. पण बाकी कोणीच त्याचा फायदा घेतला नाही.

चीनकडून आलेला आणखी एक शोध म्हणजे बंदुकांची दारू. चीनमध्ये हा शोध तेराव्या शतकाच्या अखेरीला लागला. पण चीनने या शोधाची पुरी जोपासना केली नाही. त्यांनी दारूचा उपयोग स्फोटके तयार करण्यासाठी न करता आगीचे बोळे करण्यासाठी केला. बाण उडवण्यासाठीही या दारूचा उपयोग करीत. चीनला बाह्य शत्रूंपेक्षा अंतर्गत बंडाळीची जास्त धास्ती वाटे. अशा बंडाळीत माणसे मारण्यापेक्षा त्यांना पळवून लावण्यासाठीच लढाईचा उपयोग होई व तेवढ्या कामासाठी स्फोटकापेक्षा आगीचा बोळा उपयोगी पडे. याउलट युरोपात, या दारूपासून स्फोटके बनवण्यात आली. किल्ले जिंकून घ्यायला स्फोटकेच उपयोगी. चर्चच्या घंटा ओतण्यासाठी लागणारा धातू याच काळात युरोपीय लोकांना सापडला. त्या धातूचा उपयोग बंदुका व तोफांसाठी करता येईल ही अटकळ लगेचच मिळाली. परिणाम असा झाला की, बंदुकीच्या दारूचा अधिक कार्यक्षम उपयोग युरोपातच झाला.

### युरोपच्या उत्कर्षाचे बीज

(अ) पंधराव्या शतकाच्या उंबरठ्यावर पाश्चात्त्य, इस्लामी व चिनी या संस्कृती विकासाच्या जवळपास एकाच टप्प्यावर होत्या. युरोपीय संस्कृती इतर संस्कृतींवर मात करणार असे स्पष्ट दिसू लागले होते. युरोपात नवे शोध लागत होतेच, पण चीन व इस्लाम यांनी लावलेले शोध आत्मसात करून त्यांचा अधिक परिणामकारक उपयोग करून घेण्यातही युरोप यशस्वी होत होते. असे का झाले?

ज्या १००० ते १४०० या काळाचा आपण विचार करीत आहोत त्या काळात मुसलमानी संस्कृती स्पेनच्या दक्षिण भागापासून इंडोनेशियापर्यंत पसरली होती. त्यापूर्वी इ.स. ७५० ते १००० या काळात इस्लामी विज्ञान व तंत्रज्ञान भरभराटीला आले होते. पण इ.स. १००० नंतर इस्लामी संस्कृतीला उतरती कळा लागली. वैज्ञानिकांची धर्माकडून गळचेपी होऊ लागली. इस्लामी धर्मगुरूंची ज्ञानाकडे पाहण्याची वृत्ती प्रथमपासूनच शत्रुत्वाची होती. इब्न खाल्दिन या इतिहासकाराने लिहिले आहे की, 'मुसलमानांनी पर्शिया जिंकला (इ.स. ६३७ ते ६४२) तेव्हा पुस्तके व वैज्ञानिक निबंध यांचा मोठा साठा सापडला. त्या वेळी खलिफा ओमरने सेनापतीला सांगितले की, 'हा सगळा कचरा पात्रात टाक. त्यात काही मोलाचं असेल, तर ईश्वराने ते आपणांला पूर्वीच दिले आहे; आणि काही चुकीचे असेल, तर ईश्वराने त्याच्यापासून आपला बचावही केलेलाच आहे!"

ख्रिश्चन धर्मात धार्मिक बाबी कोणत्या व ऐहिक कोणत्या यांची वाटणी करून टाकली आहे. मुसलमान धर्मात हा फरक केलेला नाही. धार्मिक राजसत्ता (थिऑक्रसी) ही इस्लामच्या दृष्टीने आदर्श स्थिती आहे. पण अशा सत्तेचा अंकुश विज्ञानाला मारक ठरतो.

दुसरे असे की, इस्लामी संस्कृतीत विज्ञानाची वाढ झाली तरी नवी तंत्रे, उदा. बंदुकीची दारू, कागद, घड्याळे, बाहेरूनच







अनुक्रमणिका

आली होती. इ.स. ११०० नंतर इस्लामी संस्कृतीत नवे शोध लागलेच नाहीत.

(आ) चिनी संस्कृती युरोपीय संस्कृतीवर मात करू शकेल. इतकी तंत्रपुष्ट होती. हातगाडी, घोड्याची रिकीब, होकायंत्र, कागद, छपाई, बंदुकीची दारू, चिनी मातीची गुळगुळीत भांडी इतके सगळे शोध चिन्यांनी लावले होते. नडिहॅम प्रभृती संशोधक तर सांगतात की, लोखंड शुद्ध करणे, कापड विणणे या बाबतीतले चिन्यांचे कसब गाठायला इंग्लंडला सातशे वर्षे लागली. मग प्रश्न येतो की, चिनी संस्कृती मागे का पडली? आपण असे धरून चालतो की, ज्ञान सतत विकास पावत जाते. उपयुक्त कला नाहीशा होत नाहीत. त्या अधिक सोप्या व नेटक्या होतात. पण चीनच्या उदाहरणावरून दिसते की, हे खरे नाही. पाणचक्कीवर चालणारी घड्याळे चिन्यांपाशी होती, हे आपण पाहिले. पण नंतर कालमापनाच्या बाबतीत, पाश्चात्त्य घड्याळे येऊनही, चीनने काहीच प्रगती केली नाही. तागाचे कापड विणायला जे माग चिन्यांनी शोधून काढले ते माग कापसाचे कापड विणायला वापरावेत, हे चिन्यांना सुचले नाही. चिनी तंत्रज्ञानाने जो हुरूप सुरुवातीला दाखवला, तो पुढे टिकला नाही. याची कारणे इतिहासकार सांगतात ती अशी :

(१) चिनी संस्कृतीत खाजगी मालमत्ता विहित नव्हती. याचा अर्थ खाजगी मालमत्ता नव्हती असे नाही; पण राजसत्ता ती केव्हा जप्त करील याचा भरवसा नव्हता. या बाबतीत चिनी सम्राटांनी समुद्री व्यापाराचा जो खेळखंडोबा केला, तो पाहण्यासारखा आहे. (२) स्त्रियांना घरातच डांबून ठेवले होते. त्यामुळे फार मोठा कामगारवर्ग स्वस्थ बसून राहिला होता. युरोपात व पुढे जपानमध्ये स्त्रियांना मुद्दाम उद्योगाला जुंपण्यात आले. त्यात स्त्रियांची पिळवणूक झाली. पण उत्पादन वाढले व आर्थिक विकास घडून आला. (३) राज्यकर्त्यांच्या हाती सर्वंकश सत्ता होती. खाजगी उपक्रमशीलता व सार्वजनिक चळवळी यांना अजिबात वाव नव्हता. प्रत्येक गोष्टीवर रूढी अंमल गाजवीत होती व रूढीची अंमलबजावणी हे सरकारचे मुख्य काम होते. रिवाजांची पकड, परंपरावाद, जखडबंद व्यक्ती अशी गळचेपी झाल्यावर उपक्रमशीलता व तंत्रशोधकता या गोष्टी मारल्या जातात.

(इ) या काळात (इ.स. १००० ते १५००) युरोपातली परिस्थिती अगदी उलट होती. युरोपात हा काळ बंधने तोडण्याचा, जीर्णमतवाद्यांना धुडकावण्याचा, घातक हितसंबंधांना झुगारण्याचा, नवीन संशोधनाचा पिच्छा पुरविण्याचा आणि बाहेरच्या संस्कृतीतील शोध आत्मसात करण्याचा होता. या प्रगतिपर वातावरणाचा परिणाम असा झाला की, चर्चदेखील प्रगतिशील झाले. धर्मगुरूंना चिंतनाला वेळ मिळावा म्हणून चर्चमधील उसाभरीच्या कामासाठी यंत्रांचा वापर सुरु झाला. ही यंत्रे चालवण्यासाठी व चर्चच्या व्यावहारिक गरजा पुरविण्यासाठी सामान्य माणसे चर्चमध्ये नोकर म्हणून आली. चर्चच्या शेतीवाडीवर पाणचक्क्यांनी कामे करण्यास सुरुवात झाली.

पारलौकिकाची ओढ दूर होऊन ऐहिकातच गोडी वाटू लागली. इथलेच आयुष्य सुखावह झाले पाहिजे, हा ध्यास समाजाने घेतला. त्यासाठी नवीन यांत्रिक शोध लावले. उद्योग व व्यापार यात उपक्रमशीलता दाखवली. युरोपीय संस्कृतीचे हे विशेष एका-एकी उपजले नव्हते. परंपरेतील काही स्रोतांशी त्यांचे नाते होते. हे स्रोत असे :

(१) शारीरिक कष्टांना ज्यू व ख्रिस्ती धर्मांत प्रतीष्ठा होती. (२) सृष्टी ही मनुष्याच्या सुखासाठी निर्माण झाली आहे, ही शिकवण या दोन्ही धर्मांत आहे. झाडा-दगडात व पशु-पक्ष्यांत देव पाहणाऱ्या (ॲनिमिस्टिक) धर्मांत ही शिकवण बसणार नाही. (३) ख्रिश्चन व ज्यू शिकवणीप्रमाणे काळ हा सरळ रेषेत विस्तार पावत जातो. आपण वर्तुळाकार फिरून मूळ ठिकाणी येतो, असा विचार या धर्मांना मान्य नाही. इतर धर्मांनी काळाचे चक्र मानले आहे. (४) स्वतंत्र बाजारपेठ ही कल्पना युरोपीय संस्कृतीच्या केंद्रस्थानी होती. शोध लागला व तो उपयोगी आहे असे ठरले की शोधकाला भरपूर पैसा व प्रतीष्ठा मिळत होती. राज्यकर्त्यांची किंवा हितसंबंधीयांची नवीन शोधाला अडथळा आणण्याची ताकत मर्यादित होती. एकाने शोध लावला की दुसरा त्यात सुधारणा करत होता. प्रगतीला शेवट नाही आणि स्वर्गसुख पृथ्वीतलावर मिरवून घेण्याची हिकमत माणसात आहे असा एक हुरूप समाजाला प्रोत्साहन देत होता.

### कोलंबसाचे दैव

(अ) १८९२ साली कोलंबसाच्या विख्यात प्रवासाची चौथी शताब्दि अमेरिकेने मोठ्या उत्साहाने साजरी केली होती. तथापि १९९२ साली पाचवी शताब्दि मात्र अगदीच ओक्याबोक्या पद्धतीने साजरी झाली. त्यावेळी पोस्टाची तिकिटे निघाली नाहीत, प्रदर्शने झाली नाहीत, काही चर्चा-परिसंवाद झाले, पण त्यात कोलंबसाचे नाव उच्चारतानाही संकोच वाटावा अशी स्थिती होती.








असे का झाले? कोलंबसाने अमेरिकेचा शोध लावला ही मानवजातीला उपकारक गोष्ट झाली नाही असा प्रचार नवमतवाद्यांकडून मोठ्या प्रमाणात झाला. नवीन भूप्रदेशाला पोचणें, याला शोध कसे म्हणावे, असा 'मूलभूत' प्रश्न उपस्थित करण्यात आला. अमेरिकेत तद्देशीय लोक राहातच होते तेव्हा कोलंबसाचे अमेरिकेला पोचणे हा त्यांच्या दृष्टीने काही शोध नव्हता, असे प्रतिपादण्यात आले. कोलंबसाच्या या 'शोधा'मुळे अमेरिकेतील मूळ वंश व त्यांच्या संस्कृती नाहीशा झाल्या. गोऱ्या लोकांनी आदिवासींवर घोर अत्याचार केले, असे आकडेवारीनिशी सांगण्यात आले. काहीनी असेही सुचवले की, याचे सामूहिक प्रायश्चित गोऱ्या लोकांनी घेतले पाहिजे.

(आ) कोलंबसाच्या प्रवासाविषयी जे काहूर उठले त्याला काही सत्याचा अंश होता, काही मूर्खपणाचा भाग होता आणि बऱ्याचश्या अप्रस्तुत गोष्टींचा भरणा होता. हे खरेच आहे की, कोलंबस व त्याच्या मागोमाग जे युरोपीय लोक अमेरिकेत गेले त्यांनी मोठमोठे भूप्रदेश व्यापले व आदिवासींना तेथून हुसकावून लावले. हेही खरे आहे की, स्पॅनिश आक्रमकांनी तद्देशीयांवर अनन्वित अत्याचार केले. लहान मुलांना पोटात भाले खुपसून मारले. बाण मारण्याचा सराव करण्याच्या नावाखाली आयांच्या कडेवरची मुले बाण सोडून मारली. स्त्रियांवर बलात्कार केले. पुरुषांना गुलाम केले. एक नव्हे, तर तीन संस्कृती धुळीला मिळविल्या. युरोपीयांनी प्रत्यक्षात जेवढे आदिवासी मारले त्याच्या किती तरी पट अधिक आदिवासी या युरोपीयांच्या बरोबर जे रोगजंतु अमेरिकेत आले, त्या रोगजंतूंमुळे मेले.

तथापि, कोलंबसाने अमेरिकेचा शोध लावला नाही; तो फक्त तिथे पोचला, याला वाद म्हणत नाहीत तो केवळ शब्दच्छल आहे. हे कुणीच अमान्य करीत नाही की, आदिवासी अमेरिकेत आधीपासून होते. कोलंबसाला अमेरिका सापडली असे म्हणताना आदिवासींना कोलंबस व युरोपीय लोक सापडले असे म्हणायलाही हरकत नाही. गणितात एखादे नवे प्रमेय सापडते तेव्हा हाच प्रश्न उपस्थित होतो; ते प्रमेय गणितात होतेच; विशिष्ट गणितज्ञाला ते आठवले, इतकेच. तसेही असेल, पण त्यानंतर गणिताचा चेहरा-मोहरा बदलला, हे तर खरेच. तीच गोष्ट अमेरिकेच्या शोधाची. कोलंबस अमेरिकेला पोचल्यानंतर इतिहासाची दिशाच बदलली, हे नाकारता येणार नाही. मूल्यांकनाची बाब बाजूला ठेवून या युगप्रवर्तनाचे श्रेय कोलंबसाला द्यावेच लागेल.

तथापि कोलंबसाला खलपुरुष ठरवणाऱ्या विचारवंतांच्या टीकेचा रोख इतिहासकारांवर असतो. त्यांचे म्हणणे असे असते की, इतिहासकार यूरोपला नायकाची भूमिका घेऊन इतिहासाची मांडणी करतात. पण युरोपच्या दृष्टीने इतिहासातील भौगोलिक शोधांचे युग हे गौरवशाली असले, तरी इतर संस्कृतींच्या दृष्टिकोणातून ते विनाशाचे युग आहे. या टीकेत मुद्दा नाही असे नाही. पण इतिहासकार तारतम्य राखून घटनांकडे पाहतो. युरोपीय लोकांनी आदिवासींचा वंशनिच्छेद केला याची नोंद तो घेतोच; पण त्याला हेही नोंदवावे लागते की, भौगोलिक शोध हे त्या काळच्या युरोपच्या विक्रमशाली पुरुषार्थाचे प्रतीक होते. युरोपीय व आदिवासी यांच्यातील संबंध केवळ एकतर्फी होते. त्या संबंधांतील कळीच्या सर्व गोष्टी युरोपीयांच्या हातात होत्या. तीन-चार हजार मैलांची साहसपूर्ण सफर करून युरोपीय नव्या जगात पोचले होते. याचा अभिमान धरावा की नाही, हा स्वतंत्र प्रश्न आहे. कोणतीही मोठी घटना घडली की, तिची प्रतिष्ठा वाढवण्यासाठी खऱ्या-खोट्या तपशिलांचा भरणा करून ती घटना रुजवून धजवून मांडायची. हा मनुष्य स्वभावच आहे. तसे असले तरी जे जाणते इतिहासकार आहेत, त्यांनी आदिवासींचे जे वाटोळे झाले त्या कडे कधीच दुर्लक्ष केले नाही व नव्या जगाचा शोध ही निरपवाद अभिमानास्पद घटना होती, असेही मानले नाही.

इ) कोलंबसाला अमेरिकेचा शोध लागला ही काहीशी योगायोगाची घटना होती. पण कोलंबसाने केलेला शोध-प्रवास हा युरोपच्या प्रगतीतील अटळ टप्पा होता. पंधराव्या शतकाच्या अखेरीस युरोपने अस्त्रबळात व नौकानयनात इतके प्राविण्य संपादिले होते की, जगात कोठेही जावे आणि प्रवेश जिंकून घ्यावेत अशी विजिगीषा त्यांना वाटू लागली होती. यातून साम्राज्ये स्थापन होणार हे ठरल्यासारखेच होते. दोन मानव-समूहातील एक दुबळा असेल तर दुसरा या ना त्या प्रकाराने पाहिल्यावर वर्चस्व गाजवणार, हे अपरिहार्य आहे. परोपकार, ध्येयवाद, बंधुता या भावना समूहमनात जशा प्रबळ असतात तशाच आक्रमण व वर्चस्व यांच्या इच्छाही समूहमनावर पगडा मिरवीत असतात. वर्चस्ववादी समाजाला कह्यात ठेवणारी शासनयंत्रणा नसेल तर तो प्रबळ समाज निर्बळ समाजाला दास करणार, हे ठरलेलेच आहे.

युरोपातील आक्रमक प्रवृत्तींना धर्मगुरूंच्या (क्रूसेड्स) काळापासून खतपाणी मिळाले होते. ख्रिस्ती धर्मस्थळे मुसलमानांच्या ताब्यातून सोडवण्यासाठी ही 'धर्मयुद्धे' लढण्यात आली तरी ती लढताना सर्व लांड्या-लबाड्या व अनाचार करण्यात आले. त्यानंतर स्पेनमध्ये जी मुस्लिम संस्थाने होती, ती जिंकून घेण्यात आली. पंधराव्या शतकाच्या अखेरीला युरोपच्या कोणत्याही भागात मुसलमानी सत्ता उरली नव्हती. याच काळात पोर्तुगॉल व स्पेन यांनी नौकानयनात प्राविण्य मिळवले. युरोप व आफ्रिकेच्या किनाऱ्यापासून काही अंतरावर ॲटलांटिकमध्ये जी बेटे आहेत त्यावर या देशांनी ताबा बसवला. यातील काही बेटे रोमन लोकांनाही माहीत होती. पण ती ताब्यात घेऊन तेथे वसाहती कराव्यात अशी इच्छा रोमन लोकांना झाली नव्हती. पोर्तुगीजांनी तेथे वसाहती केल्या आणि आपल्या रहिवासासाठी उपलब्ध असणाऱ्या प्रदेशाचा विस्तार केला.

युरोपच्या दक्षिणेला व आफ्रिकेच्या पश्चिमेला असणाऱ्या मदैरा व कॅनरी या बेटांवर ऊस लावण्याचा प्रयोग पोर्तुगीजांनी केला. धर्मगुरूंच्या काळात पश्चिम आशियात पोर्तुगीजांची उसाशी ओळख झाली होती. हिंदुस्थानातला ऊस अरबांनी पश्चिम आशियात नेला व धर्मयुद्धखोरांनी तो सिसिली, पोर्तुगॉल व ग्रीसमध्ये आणला. साखर ही अशी वस्तु आहे की, तिची आवड जाणवून घ्यावी लागत नाही; ती आपसकूच आवडते व नंतर तिची चटक लागते. सुरुवातीला युरोपात साखर फारच महाग होती. तिचा फक्त औषधासाठी उपयोग होई. नंतर वाण्याकडे मिळू लागली इतकी साखर स्वस्त झाली. अन्नाला चव आणण्यासाठी तिचा उपयोग होऊ लागला. साखरेच्या पाकात अन्नपदार्थ टिकतात, असा अनुभव आला. श्रीमंतांच्या घरात पुरवून वापरण्याचा जिन्नस म्हणून कुलुपात ठेवली जाणारी साखर साऱ्या समाजाला गोडी लावून गेली.

युरोपात भूमध्य समुद्राच्या काठाकाठाने होणारे साखरेचे उत्पादन चिमूटभर वाटावे इतके सारखेचे प्रचंड उत्पादन ॲटलांटिक मधील बेटांवर होऊ लागले. या बेटांचे हवामान ऊसाला मानवणारे होते. ऊसाचे मळे थाटले, तेव्हा मजुरांची गरज भासू लागली. त्यासाठी गुलामांचे व्यापारी आफ्रिकेतील अरबांकडून काळे गुलाम खरेदी करून आणू लागले. पूर्वी गोऱ्यांचा अरबांशी संबंध सोने, हिरे यांच्या व्यापारापुरता होता. आता माणसे ही व्यापाराचा माल म्हणून वापरात आली.

सारांश, युरोपच्या विस्ताराला कोलंबसाच्या आधीपासूनच सुरूवात झाली होती. ॲटलांटिकमधून शेकडो मैल पश्चिमेला व आफ्रिकेच्या किनाऱ्याने हजारो मैल दक्षिणेला नाविक पोचलेच होते. कोलंबस हजारो मैल पश्चिमेला गेला. त्याने नव्या जगाचा शोध लावला. त्यानंतर अमेरिकेतील आदिवासींचे निर्घृण हत्याकांड झाले. माणसांनी हिंसाचार केलाच, पण रोगजंतूमुळे त्याहून किती तरी पट अधिक आदिवासी मेले. त्यानंतरच्या दोनशे वर्षात पश्चिम गोलार्धात अपर युरोपच बसवण्यात आले.

### पूर्वेकडे मुसंडी

(अ) स्पेनच्या राजाच्या सहाय्याने जिनोआचा कोलंबस आशियाच्या शोधात पश्चिमेला गेला आणि अमेरिकेला पोचला. तेथे त्याच्या हाती काहीच लागले नाही. ना सोने, ना हिरे, ना मोती, ना वैभवशाली नगरे! फक्त उघडे-नागडे आणि भिंगूळवाणे आदिवासी. या उलट कोलंबसाच्या प्रवासानंतर सहाच वर्षात पोर्तुगॉलने असाध्य ते साध्य करून दाखवले. त्यांचा वास्को-द-गामा आफ्रिकेला वळसा घालून हिंदुस्थानात पोचला व तेथील अपरंपार संपत्तीची माहिती त्याने आणली. त्या वेळी पोर्तुगॉलचा राजा मॅन्युएल याने स्पेनचे राजदांपत्य फर्डिनांड व इझाबेला यांना लिहिले की, "आमच्या नाविकांनी हिंदुस्थानात समृद्ध शहरे, उंचच्या उंच इमारती, मोठाल्या नद्या आणि अमाप लोकवस्तीने नटलेले प्रदेश पाहिले." म्हणजे उघडे-नागडे आदिवासी नव्हते! पुढे मॅन्युएलने मसाल्याचे पदार्थ आणि हिरे-मोती यांची बढाई मारत म्हटले की, "तेथे सोन्याच्या खाणी आहेत."

पोर्तुगॉलच्या राजाचा अहंकार सार्थ होता. आफ्रिकेच्या किनाऱ्याने दक्षिणेकडे जाण्याचा पोर्तुगॉलचा खटाटोप गेले शतकभर चालू होता. हा प्रवास धोक्याचा होता; कारण, सामुद्री प्रवाह आणि आकाशातील वारे उलटे वाहात होते. जसजसे दक्षिणेकडे जावे तस-तसा ध्रुवतारा क्षितिजावर खाली-खाली जातो व ध्रुवाच्या आधाराने दिशा पाहणे अशक्य होते. विषुववृत्त ओलांडल्यावर तर ध्रुव दृष्टिआड होतो. या अडचणींवर मात करण्यासाठी पोर्तुगीजांना नौकानयनाला उपयोगी अशा अनेक उपकरणांचा शोध लावावा लागला व तशी माहिती गोळा करावी लागली. होकायंत्राचा नेमका वापर करण्याची युक्ति, ग्रह-ताऱ्यांचे वेध घेण्याची यंत्रे, वाळूचे घड्याळ यांचे

शोध या उद्योगातून लागले. अक्षांश-रेखांश, सामुद्री-प्रवाह व व्यापारी वारे यांचे शिक्षण देऊन खलाशी तयार करावे लागले. इतकी सामग्री सज्ज झाली तेव्हाच गामाचा काफला आफ्रिकेच्या दक्षिण टोकाला वळसा घालून आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील झांझीबारला पोचला व तेथून केरळात उतरला.

खुद्द गामाच्या प्रवासापासून पोर्तुगॉलला फारच थोडा फायदा झाला. कारण व्यापारावर अरबांचे वर्चस्व होते व ते ख्रिश्चिनांशी व्यवहार करायला तयार नव्हते. गामाने व्यापारा-करता आफ्रिकेतील व अमेरिकेतील आदिवासींना ज्याचे आकर्षण वाटे अशा तांबडी, तांब्याच्या तारा, सदरे, खेळणी अशा फुटकळ वस्तु आणल्या होत्या. त्या हिंदी लोकांना तुच्छ वाटत होत्या. पण गामाने आणलेली माहिती मात्र येऊ घातलेल्या समृद्धीची चाहूल देणारी होती. केरळात मसाल्याचे पदार्थ अतिशय स्वस्तात उपलब्ध होते आणि पोर्तुगीजांची शस्त्रे अरबांच्या किंवा हिंदी लोकांच्या शस्त्रांच्या मानाने फारच वरच्या दर्जाची होती. या माहितीवर विसंबून, गामा परत आल्यावर सहाच महिन्यात मॅन्युएलने पेट्रो अल्वारीस काब्राल याच्या नेतृत्वाखाली तेरा जहाजे व बाराशे खलाशी यांचा जंगी काफला हिंदुस्थानाकडे धाडला.

काब्रालला बादशहाची आज्ञा होती की, स्वतःहून लढाई सुरू करू नकोस. पण कोणी हल्ला केलाच तर समुद्रात लांब उभा राहा. आणि हल्लेखोरांना जवळ येऊ देऊ नकोस. लांबूनच तोफांच्या माऱ्याने त्यांची दाणादाण उडव. या सूचनांतून पोर्तुगीजांना आपल्या तोफांच्या मारगीरीविषयी वाटणारा विश्वास दिसतो. ज्यांची शस्त्रे लांबपल्ल्याची व भेदक मारा करणारी असतात ते लांबूनच शत्रूचा फन्ना उडवतात. ज्यांची शस्त्रे आखूड माऱ्याची व कमताकदीची असतात त्यांना शत्रूवर हल्ला करावा लागतो आणि वैयक्तिक शौर्यावर विजय मिळवावा लागतो. पौर्वात्य सत्ता अजून सैनिकांच्या वैयक्तिक शौर्यावर विसंबून होत्या. पौर्वात्य समाजांची लोकसंख्या जास्त होती, ते जास्त श्रीमंत व अधिक सुसंस्कृत होते. पण शस्त्रबळात ते मागे पडले होते. पाश्चात्य दर्यावर्दी जहाजातील तोफांचा आश्रय करून कोणत्याही किनाऱ्यावर पाय रोवून उभे राहू शकत होते. पाश्चात्यांचे हे सामर्थ्य पौर्वात्यांच्या ध्यानात यायला फार वर्षे जावी लागली.

(आ) पोर्तुगॉल व स्पेन यांच्या नाविक शोध-प्रवासात एक फरक होता. पोर्तुगीजांचे शोध-प्रवास हे अभ्यास-प्रवासही असत. उदा. १५८० साली एक पोर्तुगीज शोध-मोहीम मादागास्कर बेटावर गेली. त्या मोहिमेच्या प्रमुखाने कोणत्या प्रकारची माहिती गोळा करावी याचे एक १० कलमी आज्ञापत्रच पोर्तुगीज सरकारने तयार केले होते. त्यातली महत्त्वाची कलमे अशी होती.

(१) सर्व बेटाला फेरी मारून प्रत्येक बंदरात जावे. वारे कसे वाहतात, सामुद्री प्रवाहांची दिशा कोणती आहे, समुद्राचा तळ कसा आहे, बंदरात जाण्या-येण्याची वाट कोणती आणि नांगर कोठे टाकतात, ही माहिती नोंदवून ठेवावी.

(२) तेथील आदिवासी मुसलमान आहे की मूर्तिपूजक आहेत, ते कशा घरातून राहातात, त्यांच्याकडे संपत्ती किती आहे, लष्कर व शस्त्रे कोणत्या प्रकारची आहेत, लष्करी जवान शूर आहेत की नाहीत, न्यायव्यवस्था कशी आहे ही माहीती शोध काढून मिळवावी.

(३) तिथे चलन कोणते आहे? तांब्याची नाणी पाडत असतील तर तांब्याचे आणखी कोणते जिन्नस ते तयार करतात? तांब्याच्या तोफा ओततात काय?

१५३७ साली एका पोर्तुगीज मुत्सद्याने लिहिले होते की, "आम्ही जे भौगोलिक शोध लावले ते योगायोगाने लागले नाहीत. आमचे खलाशी पूर्ण शिक्षण घेऊन या शोधांसाठी निघाले होते. त्यांना भूमिती आणि खगोलशास्त्र यांची चांगली माहिती होती. त्यांच्यापाशी योग्य ती साधनेही होती." स्पेनपाशी हा पद्धतशीरपणा नव्हता. पोर्तुगीज आपल्याला सापडलेल्या प्रदेशाचे अक्षांश-रेखांश मांडून त्या प्रदेशाचा ताबा घेतल्याचे फर्मान काढत. उलट स्पॅनिश लोक शोधलेल्या ठिकाणी क्रॉस रोवत, चर्च बांधीत आणि तुरूंग बनवीत. स्पेनचा उद्देश संपत्ती उचलून आणावी, हा होता तर पोर्तुगीजांची इच्छा व्यापार करण्याची असे.

### चीनची माघार

अ) पाश्चात्य राष्ट्रांचा आशियात निर्वेध प्रवेश होऊ शकला, याला दोन कारणे झाली. पहिले असे की, भारतात त्या वेळी एतद्देशीय सत्ता आणि तुर्की आक्रमणे असा संघर्ष चालू होता. त्यामुळे पोर्तुगॉलच्या भारतातील प्रवेशाकडे येथील सत्तांनी दुर्लक्ष केले. दुसरे, चीनने स्वतःला स्वतःच्या देशात कोंडून घेतले होते. या दुसऱ्या घटनेमागे मोठा इतिहास आहे.

सन १४०५ ते १४३१ या काळात इंडोनेशिया व त्याच्या आसपासचा समुद्र या भागात चीनने सात मोहिमा काढला. चीनच्या राजवटीचा वर्चष्मा इकडील लोकांच्या मनावर ठसवावा, हा या मोहिमांचा उद्देश होता. दुसरा उद्देश, या प्रदेशातील नवलाईच्या वस्तु, पक्षी, प्राणी, वनस्पती, धातू व औषधी गोळा करून चीनच्या सम्राटाला त्यांचा नजराणा द्यावा, हा होता. शिवाय काही व्यापारी हेतु होते की नाही, ते कळत नाही.

यात सांगण्यासारखी गोष्ट ही की, या मोहिमा अजस्त्र प्रमाणावर काढण्यात आल्या होत्या. या स्वाऱ्यातून वापरलेली जहाजे जंगी व अनेक मजली होती. एक-एक जहाज म्हणजे लष्करी छावणीच होती, असे म्हटले तरी चालेल. प्रत्येक जहाजावर शेकडो सैनिक होते. चीनने नौका-बांधणीत मिळविलेले प्राविण्य, त्यांची आरमाराच्या व्यवस्थापनांची हातोटी, आणि नौकानयानातील कौशल्य यांची साक्ष या जहाजांवरून पटत होती. मोठाली जहाजे ४०० फूट लांब व १६० फूट रूंद, म्हणजे कोलंबसाच्या जहाजाच्या तिपटीतून मोठी होती. काही जहाजांना रेशमी व चौकोनी बारा-बारा शिडे होती. जहाजावर आरामशीर खोल्या आणि मोठाले दिवाणखाने होते. इंडोनेशियात घोडे नसल्याने या जहाजांवर घोडे नेले होते. १४०५ सालच्या पहिल्या मोहिमेत ३१७ जहाजे व २८००० माणसे सामिल झाली होती.

(आ) त्या काळात चीनच्या सम्राटांनी जहाज बांधणीचा अवाढव्य कार्यक्रम हाती घेतला होता. समुद्रकाठचे प्रांतच्या प्रांत या उद्योगाला लावले होते आणि लाकडासाठी शेकडो चौरस मैलांची जंगले तोडून टाकली होती. गावा-गावातून सुतार, लोहार, शिडे विणणारे, दोर गुंफणारे, जहाजाचे कणे कापणारे अशांची कुटुंबेच्या कुटुंबे बंदरात आणून बसवली होती. या कामगारांना वाचता येत नसल्याने ती जहाजे बांधावयाची त्यांच्या प्रतिकृति शाही अभियंत्यांनी बनवून त्यांच्या पुढे मांडल्या होत्या. त्या प्रतिकृतींवरून ही मोठी जहाजे बांधत.

जहाज बांधणारे फार काळजी-काट्याने काम करीत आणि अगदी शुल्लक गोष्टींच्या बाबतीतही हयगय होऊ देत नसत. प्रत्येक खिळ्याला तो गंजू नये यासाठी रोगण लावीत. दोन फळ्यांच्या मधल्या फटीत तागाचे धागे कोंबून त्या फटी लिंपून टाकीत. १४०५ ते १४०८ या तीन-चार वर्षात १६८१ जहाजे बांधण्यात आली.

जहाज बांधणीतील चीनची ही प्रगती लक्षात घेता त्यावेळी ते युरोपच्या शेकडो वर्षे पुढे होते, असे म्हणावे लागते. जहाज बांधणीसाठी ड्राय डॉक्स बांधण्यांची चिन्यांची युक्ति युरोपीयांना त्यानंतर ४०० वर्षांनी सुचली. जहाजांची सुबक बांधणी, बळकट सुकाणू, जहाजाचे नेमके संतुलन व्हावे यासाठी भरावयाचे भारवात या गोष्टी देखील तत्कालीन युरोपच्या कल्पनेच्या पलिकडच्या होत्या.

(इ) चीनचा हा अफाट नाविक उद्योग १४३० सालानंतर अकस्मात बंद करण्यात आला. त्या वेळी नवा सम्राट गादीवर आला आणि सल्लागारांचे वेगळेच टोळके दरबारात मुखत्यार होऊन बसले. या टोळक्यात चीनच्या सनदी नोकरांचा भरणा होता आणि या लोकांना व्यापाराचा, समुद्र-सफरींचा तिटकारा होता. आधीच्या सम्राटाच्या खोनी हा नाविक उद्योग उचलून धरला होता व त्या खोज्यांचे आणि नव्या टोळक्याचे वाकडे होते. या नवीन सल्लागारांनी असा धोशा लावला की, ह्या नसत्या उद्योगामुळे राज्यकारभार ढासळला आहे आणि खजिन्यात पैशाचा खडखडाट झाला आहे.

याच वेळी असा निर्णय घेण्यात आला की, चीनची राजधानी नानकिंगहून पेकिंगला न्यायची. त्यासाठी पेकिंग शहराची तटबंधी करण्यात आली आणि ९ हजार खोल्यांचा राजवाडा तिथे बांधला. ह्या खर्चामुळे करांचा बोजा वाढला. आक्रमणे चालू होतीच. या सर्व कारणांनी नौकाबांधणी व दर्यावर्दी मोहिमा यांचा प्रचंड उद्योग बंद करण्यात आला. इतकेच नाही तर अशा उद्योगांची आठवणही कोणी काढू नये, असा बंदोबस्त करण्यात आला. सन १५०० मध्ये असा हुकूम निघाला की, खाजगी जहाजांना दोनापेक्षा जास्त शिडे असता कामा नयेत. १५५१ साली फर्मान निघाले की, व्यापारासाठी देखील मोठी जहाजे वापरावयाची नाहीत.

(ई) चीनच्या या अवसान घातकी वागणुकीचे बीज काय? चीनपाशी नौकाबांधणीचे तंत्रज्ञान होते, मोठे काफले उभारण्याचे सामर्थ्य होते व जंगी मोहिमा पार पाडण्याचा व्यवस्थापन-कौशल्यही होते. पण या नाविक उद्योगाला कोणताच दीर्घकालीन उद्देश नव्हता. चिनी समाजाची अशी धारणा होती की, आपण स्वयंपूर्ण आहोत आणि आपल्याला उपयोगी असणाऱ्या वस्तु आपल्या देशात निर्माण होतात. त्यामुळे आपल्याला व्यापाराची गरज नाही. आपला समाज श्रेष्ठ आहे व बाकीचे समाज असंस्कृत आणि रानटी आहेत. त्यांच्या

पासून आपण काही शिकावे असे नाही. एवढे आरमार उभारण्यामागे त्यांचा हेतू इतकाच होता की, त्याचे प्रदर्शन मांडून इतरांवर वचक वसवावा. असा अहंकारी उद्देश कोणताही उद्योग सतत चालू ठेवण्यास पुरेसा असत नाही.

युरोपची स्थिती याच्या उलट होती. आशियात पोचायचे व व्यापार वाढवायचा हा त्यांचा उद्देश स्पष्ट व निरंतर प्रेरणा देणारा होता. त्यामुळे पोर्तुगॉल व स्पेन यांचा आणि नंतर इंग्रज, डच व फ्रेंचांचा नाविक उद्योग शतकामागून शतके चालत राहिला व वाढत गेला. व्यापारामागून साम्राज्ये आली.

दुसरे असे की, पाश्चात्यांची सागर-पर्यटने राजाच्या आश्रयाने चालली तरी मुळात खाजगी उपक्रमशीलता त्यांच्या पाठीशी होती. अनेक व्यक्तींनी भांडवल एकत्र करावयाचे व सागरी सफरी घडवून आणायच्या, असे त्या व्यापाराचे रूप असल्याने तो धंदा एकट्या-दुकट्याच्या लहरीवर अवलंबून नव्हता. चीनमध्ये ही व्यापारी वृत्ती मुळातच नव्हती. खेरीज चिनी समुद्रात चाच्यांचा उपद्रव असल्याने सरकारी संरक्षणा-खालीच दर्यावर्दी सफरी शक्य होत्या.

चिन्यांनी अशा कारणांनी समुद्राकडे पाठ फिरविली असावी. १४७७ साली असे झाले की, चिनी गुप्तहेर खात्याचा प्रमुख खोजा वँग प्री याने पूर्वीच्या सागर प्रवासांचे अहवाल वाचायला मागितले. पण चिनी संरक्षण खात्याने ते अहवाल दिले नाहीत. खात्याच्या प्रमुखाने सांगितले की, ते अहवाल दंतकथांनी भरलेले व अतिरेकीत असल्याने लोकांनी न वाचलेलेच बरे!

(उ) कित्येक इतिहासकार असा प्रश्न उपस्थित करतात की, चिन्यांनी नौकानयन थांबवले नसते, तर काय झाले असते? पोर्तुगीज हिंदी महासागरात उतरल्यावर त्यांची चीनच्या आरमाराशी गाठ पडली असती, तर कसे झाले असते? चीन आफ्रिकेच्या किनाऱ्यापर्यंत पोचला होता. तो आफ्रिकेला वळसा घालून युरोपात पोचला असता, तर इतिहास किती बदलला असता? हे प्रश्न मनोरंजक व कल्पनेला खाद्य पुरविणारे असले, तरी त्यांची उत्तरे आपणास कधीच कळणारी नाहीत. त्या प्रश्नांचा पाठपुरावा करताना आपणाला इतिहासाची नवी जाणीव निर्माण होते, हाच फायदा.

चिन्यांनी आपल्या आरमाराचा विस्तार चालूच ठेवला असता तर केव्हातरी पाश्चात्यांशी गाठ पडून लढाई झालीच असती. प्रथम दर्शनी वाटते की, चिनी वरचढ होते व त्यांनी पाश्चात्यांचा निःपात केला असता. पण हे खरे नाही. पाश्चात्यांच्या तोफा लांब पल्ल्याच्या होत्या व मारा भेदक होता. पाश्चात्यांची जहाजे लहान असली, तरी चपळ होती. त्यांनी चीनच्या महाकाय जहाजांना सतावून सोडले असते. पाश्चात्य दर्यावर्दी अधिक प्रवीण होते. आता, असेही म्हणता येणे शक्य आहे की, चिन्यांनीही पाश्चात्यांचे कौशल्या हस्तगत केले असते. त्यांनाही लांब पल्ल्याच्या तोफा मिळाल्या असत्या. ह्या विचारांना काहीच अंत नसतो.

⌘⌘

---

## लेखक परिचय


❖ **श्री.मा. भावे** : प्राध्यापक, आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक. या विषयांशी संबंधीत २५ शोधनिबंध प्रसिद्ध. शिक्षक चळवळीत सहभाग. **पत्ता** : ३३/२०, ४थी गल्ली, प्रभात रोड, पुणे ४११ ००४.

❖ **नीरज हातेकर** : मुंबई विद्यापीठात अर्थशास्त्राचे प्राध्यापक; १७ ते २०व्या शतकापर्यंतच्या महाराष्ट्राच्या आर्थिक व राजकीय स्थित्यंतरांचा विशेष अभ्यास; या विषयावरील पाच-सहा शोधनिबंध प्रथितयश इंग्रजी नियतकालिकांमधून प्रकाशित. **पत्ता** : प्राध्यापक निवास वसाहत, कालिना कॅम्पस, मुंबई विद्यापीठ, कालिना, सांताक्रुझ, मुंबई.

❖ **विश्वास दांडेकर** : निवृत्त उच्चपदस्थ अधिकारी, आयुर्विमा महामंडळ; इतिहास, युद्धे व युद्धशास्त्र या विषयांमध्ये विशेष रूची व अभ्यास; वृत्तपत्रे व नियतकालिके यांमधून प्रासंगिक लेखन. **पत्ता** : मालवती, १७ ब, कांगा कॉलनी, सदरबाजार, सातारा.


अनुक्रमणिका

# पेशव्यांच्या मुलुखाच्या आर्थिक-राजकीय व्यवस्थेवरील इंग्रजी राज्याचा आघात : १६८९-१९४७

### (पूर्वार्ध)

नीरज हातेकर

प्रस्तुत लेखात १६८९-१९४७ या काळातील, ब्रिटिशांनी पेशव्यांकडून जिंकून घेतलेल्या 'दख्खन' मधील राजकीय-आर्थिक व्यवस्थेचा ('पोलिटिकल इकॉनॉमी') विचार केला आहे. एका अंगाने पाहिल्यास ब्रिटिश अंमल प्रस्थापित होण्यापूर्वीचा शंभर वर्षांचा काळ राजकीय बेबंदशाहीचा, उलथापालथींचा व अस्थिरतेचा काळ असल्याचे म्हणता येते. पण याही काळात शेतसारा वसूल करण्याचे व्यापक हक्क ज्यांना होते तो वतनदार-इनामदार/जागिरदार यांचा वर्ग तसेच सर्वसामान्य शेतकरी व कारागीर यांची लक्षणीय प्रमाणात आर्थिक भरभराट झाल्याचे आढळते. अठराव्या शतकातील मराठी राज्यव्यवस्था वांडगुळासारखी, निव्वळ शोषणाधिष्ठित व परजीवी नव्हती. ब्रिटिशपूर्व महाराष्ट्रातील राज्यव्यवस्था सैनिकी व आर्थिक-वित्तीय बळ असलेल्या अभिजनवर्गीय गटांच्या अधिपत्याखाली होती. ह्या गटांची बांधणी (composition) बदलत राही. गटांच्या हातात सत्ता स्थिरपणे राहात नसे. आणि सत्तेसाठी स्पर्धा करणाऱ्या गटांमध्ये नव्याने प्रवेश करणे इतरांना शक्य असे. एका बाजूला शेतसारा वसूली व अन्य मार्ग या रूपात जमिनीवर हक्क असणारा व त्या आधारे उत्पन्न कमावणारा वर्ग आणि सैन्य बाळगणारा सरदार वर्ग यांच्यात तर, दुसऱ्या बाजूला, जकात-कर-खंडणी-दंड-नजराणा इत्यादी रूपाने पैसा उभारणारी व कारभार चालविणारी राज्ययंत्रणा, आणि सर्वसामान्य शेतकरी व व्यापारीउदमी लोक यांच्यातील बदलत्या बला-बलाच्या नाजुक संतुलनावर अवलंबून असणारी ही व्यवस्था होती. या दोन पातळ्यांवर, स्थानिक पातळीवर कलह माजलेले असणे ही नेहमीची स्थिती असे. त्याची हुशारीने, युक्तीने, बेरकीपणाने हाताळणी करून आपले प्रभुत्व व पकड घट्ट कायम ठेवणे ही आधी छत्रपती भोसल्यांच्या व नंतरच्या काळात पेशव्यांच्या समोरची मध्यवर्ती राजकीय समस्या होती.

या कलहपूर्ण वातावरणाचा व कलहांच्या पाताळयंत्री कारस्थानी हाताळणीचा स्वतःच्या आर्थिक भरभराटीसाठी व राजकीय उत्कर्षासाठी व्यक्ती फायदा करून घेऊ शकत असत. अशा महत्त्वाकांक्षी आणि कर्तबगार व्यक्तींसाठी कलह ही संधीच असे. या काळात व्यापारीकरण, शहरीकरण आणि चलनाचा वापर (monatisation) या प्रक्रिया गतिमान झालेल्या होत्या. या तिपेडी घडामोडींच्या आधाराने आर्थिक-सामाजिक चलनवलनाची प्रक्रिया गतिमान व पुष्ट होत होती. कलह काबूत आणण्याच्या, त्यांची हाताळणी करण्याच्या राजकारणामुळे कधी कधी स्थानिक पातळीवर थोडक्या काळासाठी स्थानिक अर्थव्यवहारांची घडी विस्कटत असे; मात्र, दीर्घकालीन आलोकात पाहिल्यास, वतनदार अभिजन आणि बहुजन शेतकरी व कारागीर ह्या दोन्ही गटांना भांडवली गुंतवणूक करण्याच्या, तसेच उत्पन्न वाढविण्याच्या नवनवीन संधी उलब्ध होत गेल्या असे आढळते. लढाया, रोगराई व दुष्काळ यांनी पुनःपुन्हा ग्रस्त व त्रस्त राहिलेला खानदेश हा (त्यावेळच्या पेशव्यांच्या राज्यांच्या दृष्टीने) 'सीमावर्ती' प्रदेश घेतला तरी, अठराव्या शतकाची अखेर आणि एकोणिसाव्या शतकाचा आरंभ हा काळ अर्थव्यवस्थेच्या दृष्टीने लक्षणीय प्रमाणात गतिमान व वर्धिष्णू राहिल्याचे आढळते.

प्रादेशिक पर्यावरणीय वैशिष्ट्ये, नैसर्गिक संसाधनांची देणगी आणि लोकसंख्येची कमीअधिक विरळता यांचा आणि त्या त्या प्रदेशातील राजकीय-आर्थिक व्यवस्था यांचा अनिवार्य घनिष्ठ संबंध आढळतो. या मर्यादांचा स्वीकार करून आर्थिक वाढ साध्य करण्याच्या दृष्टीने एतद्देशीय समाजाने उपकारक अशी राजकीय रणनीती अंगिकारून संस्थात्मक व्यूह विकसित केला होता. शेती उठित करण्याच्या संदर्भात श्रमशक्ती या उत्पादनघटकाची टंचाई आणि एकंदर अर्थव्यवस्थेच्या संदर्भात भरीव, विश्वासार्ह माहितीचा अभाव या प्रकारचा हा काळ होता. कोकण सोडून उर्वरित महाराष्ट्रातील बराचसा भाग हा अनिश्चित पाऊसमानाचा असल्याने, शेती उत्पादनात वार्षिक हेलकावे व दर काही वर्षांनी पडणारा कमीअधिक तीव्रतेचा दुष्काळ यांनी दख्खन प्रदेश ग्रस्त असल्याने, येथे बंगालप्रमाणे







अनुक्रमणिका

स्थिर व हुकुमी समृद्ध कृषिप्रधान अर्थव्यवस्था निर्माण करणे शक्य नव्हते.

आर्थिक इतिहासाच्या विषयातील एक जुना प्रतिष्ठित संप्रदाय असे मानणारा आहे की, अठरावे शतक हा भारताच्या इतिहासातील विध्वंस व अनागोंदी यांचा काळ आहे. शेती, उद्योगव्यवसाय, व्यापार यांचे कमालीचे शोषण निर्घृणपणे करून उभारलेल्या पैशाच्या जोरावर या काळातले राजकारण चालले आणि या कारणाने अर्थव्यवस्था अगदी अशक्त व खिळखिळी झाली. औद्योगिक क्रांतीमुळे बलाढ्य बनलेल्या इंग्लंडसारख्या आर्थिक महासत्तेसमोर तत्कालीन येथील अर्थव्यवस्थेचा पाड लागणे शक्यच नव्हते.[१] सर्वसाधारणपणे या आशयाचे विश्लेषण महाराष्ट्रातील व बाहेरील भारतीय आर्थिक इतिहासकारांनी (उदा. इर्फान हबीब) यापूर्वी केलेले आहे. त्यांच्याही आधी इंग्रज इतिहासकारांनीसुद्धा अठराव्या शतकाचे वर्णन 'अंदाधुंदीचे शतक' असे केले होतेच.

परंतु गेल्या पंधरा वर्षांपासून १८व्या शतकाचे विश्लेषण बऱ्याच वेगळ्या प्रकारे केले जात आहे. या इतिहासकारांच्या मते भारतीय अर्थव्यवस्थेची गतिमान व वर्धिष्णू स्थिती आणि एतद्देशीय समूहांची आर्थिक ताकद इंग्लंडचे साम्राज्य प्रस्थापित होण्याच्या प्रक्रियेच्या केंद्रस्थानी होती. किंबहुना, येथील अशा ताकदवान एतद्देशीय समूहांना सामील करून घेतल्याशिवाय ईस्ट इंडिया कंपनीची या देशातली सत्ता वाढू शकली नसती.[२]

प्रस्तुत लेखात केलेले विश्लेषण सुमित गुहा यांनी केलेल्या विश्लेषणापेक्षाही वेगळे आहे. अठराव्या शतकातील येथील आर्थिक राजकीय व्यवस्था आत्मनाश घडविणाऱ्या वळणाची होती असे त्यांचे म्हणणे. अठराव्या शतकातील अभिजनवर्गाने शेतजमिनींमधून उत्पन्न प्राप्त करून घेण्याच्या उद्देशाने जमिनींवर हक्क प्रस्थापित करण्यासाठी फार मोठी गुंतवणूक केली असे त्यांचे निरीक्षण आहे.[३] ते म्हणतात, "पडिक जमिनी लागवडीसाठी आणण्याच्या मंद गतीमुळे जमिनींच्या खंडांमध्ये वाढ होणे अटळ ठरले. या कारणाने, उत्पन्नात भर टाकण्याच्या दृष्टीने शेतीचे उत्पादन वाढविण्या-ऐवजी, जमीनदार या नात्याने हाती येणाऱ्या राजकीय सत्तेद्वारा जमिनींवरील कुळांचे शोषण करून चटकन श्रीमंत होण्याची प्रवृत्ती बळाविली."[४]

शेतसारा गोळा करण्याचे हक्क जसजसे अधिकाधिक मौल्यवान होत गेले तसतसा जमिनींवर ताबा मिळविण्यासाठी कलहांना ऊत आला आणि परिणामी जमिनीही खराब होत गेल्या व संसाधने नष्ट झाली, असा गुहा यांचा निष्कर्ष आहे. राजकीय व लष्करीदृष्ट्या बलवान समाजघटक अशा रीतीने झटपट श्रीमंत होण्याच्या मागे लागल्याने खंडामध्ये आत्मघातकी वाढ करीत जाण्याच्या लोभाला पायबंद घालणारा अंकुशच उरला नाही. काही स्थैर्य प्राप्त झाले की शेती भरभराटत असे. मग जमिनीवर हक्क प्रस्थापित करण्यासाठी लढाया घनघोर बनत, त्यातून ग्रामीण संसाधने व उत्पन्ने नष्ट होत. 'स्थैर्य —> सुबत्ता —> उद्ध्वस्त स्थिती —> स्थैर्य —> सुबत्ता' असे चक्र १८व्या शतकातील दख्खनमध्ये फिरत राहिले, असे गुहांचे प्रतिपादन आहे.

आता, गुहांच्या मते, १८व्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात महाराष्ट्रात सतत युद्धाची धामधूम होती. म्हणजेच, त्या काळात शेतसारा गोळा करण्याचे हक्क प्राप्त करणे ही कवडीमोलाची गोष्ट ठरल्याचे आढळायला हवे. लोकसंख्येतील वाढीमुळे जमीन कसण्यासाठी शेतकऱ्यांची चढाओढ लागली होती वा शेतीची उत्पादकता गुणात्मकदृष्ट्या ठळकपणे वाढली होती असा कोणताही पुरावा या काळाच्या संदर्भात नाही. परंतु (पुढे, सदर लेखाच्या भाग १ मध्ये दाखविल्याप्रमाणे) ह्याच काळात महाराष्ट्रात आर्थिकदृष्ट्या संपन्न गोतावळे सरंजामदारी हक्क मिळविण्यात फार मोठ्या प्रमाणावर दीर्घकालीन गुंतवणूक करताना दिसतात. किंबहुना, जमिनींवरील हक्कांसाठीचे झगडे आणि त्यांची हाताळणी हे आर्थिक व राजकीय भरभराटीचे निदर्शक होते. हे झगडे क्वचित लढायांमध्ये परिणत होत असत. मात्र, अधिककरून, १८व्या शतकात यांचे स्वरूप परस्परांना धमकावण्याचे राही. १८व्या शतकातील जमिनींवरूनच्या कलहांमध्ये होणारे स्थावर व जंगम मालमत्तेचे नुकसान सहसा अल्पकालीन असे. शक्य तितक्या लौकर स्थैर्य परत प्रस्थापित करण्यावर सर्व बाजूंचा भर असे. सरंजामी हक्क जर मौल्यवान असतील आणि लढायांनी जर त्यांची किंमत शून्य होत असेल तर असे कवडीमोल झालेले हक्क परत मिळविण्यासाठी कोणी खर्चिक युद्ध करेल हे तितकेसे पटत नाही. वस्तुत:, आर्थिकदृष्ट्या सुबत्तेच्या स्थितीत असलेल्या, सारा नियमितपणे भरणाऱ्या स्थैर्यसंपन्न गावांवरील हक्क संपादित करण्यासाठी प्रयत्नशील असणाऱ्या वतनदार मंडळींमध्ये अदूरदृष्टी मला आढळत नाही. उलटपक्षी, दीर्घ कालावधी विचारात घेता, राजकारणाच्या या शैलीमुळे वतनदार घराणी आणि सामान्य शेतकरी व कुळे



अनुक्रमणिका

यांना स्वतःच्या आर्थिक परिस्थितीत व सामाजिक दर्जामध्ये उन्नती साधता आली असे आढळते.

या प्रक्रियेशी जोडल्या गेलेल्या सामाजिक आणि आर्थिक गतिशीलतेमुळे जातपातीच्या संबंधातही घुसळण घडून येत होती. या काळात राज्यसंस्थेने, तसेच गतिशील वर्धिष्णू गटांनी जात या कोटीचा वापर मोठ्या चतुरपणे आणि मुत्सद्दीपणे केलेला दिसतो. या काळात अखिल भारतात सर्वत्र एकच एक स्वरूपाची, साचेबंद व अचल अशी जातपातींची व्यवस्था/रचना आढळत नाही. दुसऱ्या बाजूला, पाश्चात्य राज्यकर्त्यांनी/अभ्यासकांनी हितसंबंधी दृष्टिकोनातून 'जात' ही संस्था जन्माला घातली असेही नाही. गणगोत पुष्कळदा एकजुटीने कृती करीत, तरी गोतावळा हेच भराभराटीच्या, उत्कर्षाच्या स्पर्धेत कामी आणले जाणारे पायाभूत एकक होते असे नाही. व्यक्ती आपले इतरही संबंध, सामाजिक भांडवल वापरात आणीत. सामाजिक व आर्थिकदृष्ट्या भरभराट पावत असलेल्या गोतावळ्यातील कुटुंबातील व्यक्तींच्या परस्परांमधील संबंधांमध्ये कलहाची हाताळणी करणारे व्यापक राजकारण, पुष्कळदा, अगदी 'कालवले' जाई. जातिसंस्था ही, एकूणच, आर्थिक आणि राजकीय जीवनाच्या प्रचंड गतिमानतेतील एक शक्ती राहिली आहे.

पावसावर अवलंबून असणारी आणि पुनःपुन्हा दुष्काळाला आमंत्रण देणारी शेती व तिच्यावर उभी असलेली अर्थव्यवस्था आणि लोकसंख्येची अल्प घनता, हे दोन घटक कायमच या प्रदेशाची आर्थिक वैशिष्ट्ये निश्चित करणारे राहिले. ब्रिटिश राजवटीच्या प्रस्थापनेने राजकीय संदर्भ मात्र महत्त्वपूर्णरित्या बदलले. राजकीय आणि सैनिकी बळाच्या जोरावर जमिनीवर सरंजामी हक्क संपादण्याचे राजकारण मोडीत निघाले. ह्या व्यवहारात गुंतलेले प्रचंड भांडवल आणि त्यातून मिळणारे भरपूर परंतु अनिश्चित उत्पन्न ह्या दोन्ही गोष्टी नष्ट झाल्या. ब्रिटिश राजवटीत बाजारपेठा एकमेकींशी अधिक चांगल्या जोडल्या गेल्या. दळणवळण सुकर झाले. जमिनीवरील मालकी हक्कांना अधिक स्थैर्य प्राप्त झाले. युद्धे जवळपास थांबली. बाजारपेठेशी वाढलेले संबंध, मालमत्तेची सुरक्षितता आणि शांततेची परिस्थिती या, वस्तुतः आर्थिक वाढीला उपकारक, सहाय्यभूत गोष्टी होत. तरीसुद्धा, एकोणिसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकापर्यंत महाराष्ट्राच्या शेतकी अर्थव्यवस्थेत मागासलेपणाची लक्षणे प्रकट झालेली होती. ब्रिटिशांचे राज्य येथे प्रस्थापित झाले नसते तर आजच्या विकसित देशांमध्ये आढळून येणारी वैशिष्ट्यपूर्ण आर्थिक व्यवस्था कालौघात अठराव्या शतकात दख्खनच्या प्रदेशात उत्क्रांत झाली असती असे प्रतिपादन मला करावयाचे नाही. अशी भाकिते वर्तविता येत नाहीत. अतिशय गतिमान व वर्धिष्णू समाजही, कोणत्याही परकीय वासाहतिक प्रभुत्वाखाली न येताच, आतल्या आत आक्रसत गेल्याची बरीच उदाहरणे इतिहासात आढळतात. १३व्या शतकातील चीन व १८व्या शतकातील नेदरलँड्स ही अशी दोन ठळक उदाहरणे होत. व्यापारवृद्धीची, व्यापारीकरणाची उच्च पातळी गाठलेली व्यवस्था त्याच वेळी "पारंपरिक संरचना, संस्था व रीतिभाती टिकवून त्यांची पुष्टी" करू शकते. नेदरलँड्समध्ये हे घडले. ज्यांच्यावर औपचारिकतः वासाहतिक राजवट कधीच प्रस्थापित झाली नाही असे 'मागास' देशही भारतासारखी अविकसन-शीलतेची वैशिष्ट्ये प्रकट करू शकतात. संसाधनस्वरूपी भांडवलसंचय, नागरीकरण/शहरीकरण आणि आर्थिक भरभराटीच्या दिशेने चाललेली वाटचाल यांमध्ये ब्रिटिश राजवटीच्या प्रस्थापनेनंतर खंड पडला हे मात्र दस्तऐवजी पुराव्याच्या आधारे म्हणता येते.

या लेखाच्या पहिल्या भागात महाराष्ट्रातील ब्रिटिशपूर्व आर्थिक व राजकीय व्यवस्था काय होती आणि तिची व्यवस्था काय होती हे आपण पाहणार आहोत. आंद्रे विंक यांनी अठराव्या शतकातील 'मराठा स्वराज्या'च्या अभ्यासाच्या ओघात 'फितना'* (fitna) हे त्या काळचे मध्यवर्ती वैशिष्ट्य कसे आढळते त्याची मांडणी केली आहे. या प्रारूपाच्या आधारे आपण विश्लेषण करू. राजकीय प्रक्रियांनी समाजातील विभिन्न थरांमधील लोकांना आर्थिक व सामाजिक भरभराट साधण्यास अवकाश उत्पन्न केला व चालनाही दिली असे आपणास आढळून येईल. दुसऱ्या भागात, १८१८ ते १९४७ या काळातील, बदललेल्या राजकीय चौकटीतील, दख्खनच्या कृषि-अर्थव्यवस्थेकडे आपण ध्यान देणार आहोत. वासाहतिक राजवटीने राज्यकारभाराची वेगळीच घडी येथे बसविली. या कालखंडातील प्रशासकीय दस्तऐवजां-मध्ये आढळणारी परिभाषा वापरावयाची तर, १८१८ ते १८५० या काळात "शांतता, सुव्यवस्था व कायद्याचे राज्य" प्रस्थापित करण्यात राज्यकर्ते गुंतलेले होते. १८१८ ते १८५० या काळात जमीन-मालकीहक्क

* फितुरी, फितविणे हे शब्दप्रयोग (तळटीप) मराठी भाषेत आपण वापरतो.






निश्चित करण्यात वासाहतिक शासन व्यस्त होते. शेतसारा किती व कसा आकारावा यासंबंधी धोरणे ठरवीत होते, आणि त्यानुसार जमावंदी करीत होते. ह्या काळात संपूर्ण भारतात शेतमालाच्या किंमती घसरलेल्या होत्या; शेतीवरील करभाराने अतिरेक गाठला होता आणि लोकसंख्येची घनता कमीच होती. ब्रिटिशपूर्व काळातल्या अभिजनवर्गाला उतरती कळा लागली होती. येथील ग्रामीण शेतकरी समाजाला, प्रथमच, एकमुखी (monolithic) व केंद्रीभूत राज्यसंस्थेच्या, तथाकथित तर्कशुद्ध ('रॅशनल') भूमिकेमधून करभार लादणाऱ्या नोकरशाहीला सामोरे जावे लागले.

१८५० ते १९३० या दुसऱ्या टप्प्यात शेतमालाच्या किंमती वधारल्या. आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत मागणी असलेल्या नगदी पिकांचा प्रभाव येथील शेतकी समाजावर दिसून येऊ लागला. लोकसंख्येची वाढ झाली. बहुतेक पिकांचे दर एकरी उत्पादन घटले. पर्यावरणाचा ऱ्हास सुरू झाला. दळणवळण व वाहतूक व्यवस्थेत आणखी सुधारणा झाली (देश अधिक घट्टपणे जोडला गेला.) दुष्काळांची तीव्रता हळूहळू कमी झाली. परंतु साथीचे रोग थैमान घालीत राहिले. शेतीवरील करांचा भार व प्रमाण या काळात सापेक्षतः कमी झाले. शेतीची व शेतकऱ्यांची स्थिती सुधारण्यासाठी नोकरशाहीच्या समजानुसार सुधारकी कल्याणकारी कायदे करून, सिंचना-खालील क्षेत्रात विस्तार साधून शेतकी अर्थव्यवस्थेतील आपला हस्तक्षेप शासनाने कायमच ठेवला. बाजारपेठेपर्यंत शेतकऱ्यांची व इतरांचीही पोच वाढली. तिचा फायदा उठवून आपली आर्थिक भरभराट साधण्याचा प्रयत्न हुशार, चळवळ्या व्यक्तींनी चालविल्याने या काळात जागोजागी स्थानिक पातळीवर आर्थिक परिस्थिती-मध्ये वर्धिष्णू गतिमानता आढळते. या गतिमानतेचे बव्हंश श्रेय या उद्यमी व्यक्तींना आहे.

या काळात नव्या 'इंग्रजी शिक्षणा'चा प्रसार व विस्तार झाला, सुधारकांकडून जातिव्यवस्थेविरूद्ध आघाडी उघडली गेली, स्त्रियांच्या स्थितीत सुधारणा व त्यांची उन्नती घडवून आणण्यासाठी उपाय अंमलात आणले जाऊ लागले. तरीदेखील, या वासाहतिक कालखंडाचा एकंदरीत विचार केला तर, स्त्रियांची स्थिती खालावली आणि जातिव्यवस्थेतील लवचिकपणा व बदलांची प्रक्रिया यांची जागा जातपातीच्या दृढीकरणाने घेतली असा ठसा उमटतो.

१९३०-५० या शेवटच्या टप्प्यामध्ये जागतिक मंदीमुळे आंतरराष्ट्रीय मागणीत घट झाली, लोकसंख्या वेगाने वाढली, व अन्नधान्याचा तुटवडा भासू लागला; शेतीच्या उत्पादनात साचलेपणा आला आणि जमीनदार व शेतमजूर यांच्यामधील आर्थिक संबंध अधिक शोषक बनले.

लेखाच्या तिसऱ्या भागात समारोप केला आहे. ब्रिटिशपूर्व अर्थव्यवस्थेमध्ये भांडवलसंचयाच्या संधीची कमतकरता नव्हती. अनेक विवक्षित पर्याय उपलब्ध असल्यास त्यांपैकी सर्वाधिक लाभकारक पर्यायाकडे भांडवल आकृष्ट होणे या कसोटीच्या आधारे कार्यक्षमता जोखावयाची ठरविल्यास येथे भांडवल कार्यक्षमरित्या प्रवाही होते असे म्हणावे लागेल. नवीन उत्पन्न देणाऱ्या संधींचा फायदा करून घेण्याची बुद्धी बाळगून भांडवलाचा ओघ तिकडे वळविण्याच्या अर्थानेसुद्धा अर्थव्यवस्था ही कार्यक्षमरित्या गतिमान होती; ही सारी प्रक्रिया काही वेचक लहान गटांपुरती सीमित नव्हती; तिच्यामध्ये व्यापक प्रमाणावर पुष्कळ लोक सहभागी होते. विभिन्न सामाजिक जातींमधले व थरांमधले लोक या प्रक्रियेत सहभागी होते. या गतिमानतेच्या संदर्भात राजकीय संदर्भ-चौकट महत्त्वाची होती. अशा कसोट्यांवर जोखल्यास अठराव्या शतकातील ब्रिटिशपूर्व भारतीय अर्थव्यवस्था गोठलेली, मागास असल्याचे आढळत नाही. १८व्या शतकातील महाराष्ट्रात आधुनिक कारखानदारी उत्पादन सुरू होण्याची पूर्वचिन्हेही आढळत नाहीत. भारतातील इतर प्रांतांमध्ये — उदा. बंगाल — वस्तूंचे उत्पादन बऱ्याच मोठ्या प्रमाणात होत होते. आधुनिक कारखानदारी औद्योगिक उत्पादनवाढीचा येथे आरंभही होण्याची चिन्हे आढळत नसल्यामुळे, काही इतिहासकारांना येथील अर्थव्यवस्थेत 'भांडवलशाही' विकासाची संभावना वा बीजे नव्हती असे वाटते.[६]

कारखानदारी पद्धतीने औद्योगिक मालाचे उत्पादन होणे म्हणजे आधुनिक भांडवली अर्थव्यवस्था अस्तित्वात येणे, असे समीकरण मांडणे यात वैचारिक गोंधळ आहे. एखाद्या अर्थव्यवस्थेचे आधुनिकीकरण झाले आहे का, म्हणजे युरोप वा उत्तर अमेरिका खंडातील विकसित देश ज्या उत्पादन पद्धतींचा व व्यवस्थेचा वापर करतात, त्या पद्धतींचा-व्यवस्थेचा अवलंब केला जाताना आढळतो का, हा प्रश्न आणि १८व्या शतकातील अर्थव्यवस्था गतिमानतेची व वर्धिष्णू असण्याची लक्षणे प्रकट करते का, हे तत्त्वतःच दोन स्वतंत्र व वेगळे

प्रश्न आहेत. केवळ 'आधुनिकते'चा आढळ होत नाही ही, एखादी अर्थव्यवस्था आर्थिकदृष्ट्या मागासलेली आहे असे ठरविण्याची एकमेव कसोटी होऊ शकत नाही.

ग्रामीण भागाशी अधिक 'विवेकनिष्ठ-तर्कनिष्ठ' (रॅशनल) संबंध आपण प्रस्थापित करीत आहोत असा वासाहतिक-साम्राज्यवादी राज्यसंस्थेचा ठाम समज होता. असे संबंध प्रस्थापित करण्याच्या ओघात तिने येथील पारंपरिक राजकीय व्यवस्था व संस्था प्रत्यक्षात मोडीत काढल्या. या संस्थात्मक रचने/व्यवस्थेनेच आर्थिक वाढीला चालना दिलेली होती. प्रतिकूल प्राकृतिक पर्यावरण आणि पुरेशा प्रमाणात श्रमशक्तीच्या पुरवठ्याचा अभाव अशाही परिस्थितीमधून येथील समाजाने आर्थिक भरभराट साधण्यासाठी काढलेला तो मार्ग होता. ब्रिटिश राजवटीने जुन्या संस्था, रीतिभाती व व्यवस्था मोडीत काढल्यामुळे, आर्थिक व्यवहारामध्ये गुंतलेले प्रचंड आर्थिक व सामाजिक भांडवल नष्ट झालेच; पण, एकंदरीत, भांडवलावर जास्तीत जास्त परतावा, नफा प्राप्त करण्याच्या वाटाही बुजविल्या गेल्या. जुन्या संस्थांच्या जागी आधुनिक विकास साधण्यासाठी पुरेशा प्रमाणात चालना देणाऱ्या रणनीतीचा अवलंब करण्यातही राज्यसंस्था अपयशी ठरली. त्यामुळे आधुनिक आर्थिक विकासाच्या प्रक्रियेलाही येथे गती मिळाली नाही. साम्राज्यसत्तेची म्हणजे इंग्लंडची अर्थव्यवस्था मध्यवर्ती व भारताची अर्थव्यवस्था तिच्या पुष्टी व वाढीसाठी, असा केंद्र-परीघात्मक (centre-periphery) संबंध प्रस्थापित केला गेला, वा बाजारपेठी संबंध-व्यूहाचेवाढत्या प्रमाणावर सर्वत्र आक्रमण झाले व हस्तक्षेप वाढला, यांकडे याचा दोष जात असेल तर तो अंशतःच. येथील उत्पादनांना जेव्हा मोठी मागणी उत्पन्न झाली आणि त्या मागणीचा रेटा दख्खनच्या शेतकी अर्थव्यवस्थेवर वाढला तेव्हा ग्रामीण भागातील पारंपरिक स्तरीकरण खिळखिळे झाले.

भारतीय अर्थव्यवस्थेमध्ये आर्थिक मागासलेपण उत्पन्न होण्याची मग कोणती कारणे होती? साम्राज्यवादी ब्रिटिश सत्तेची एक स्वतःविषयी प्रतिमा उत्क्रांत झाली होती. शेतकी अर्थव्यवस्थेतील विभिन्न घटकांच्या संदर्भात आपल्याला कोणती भूमिका वठवावयाची आहे याविषयी सत्ताधाऱ्यांची विवक्षित समज बनली होती. त्यातही, मेइजी (Meiji) कालखंडातील जपान वा झारशाहीखालील रशिया यांना आर्थिक विकास घडवून आणण्याची जशी मोठी निकड जाणवीत होती तशी कोणतीही निकड येथील सत्ताधाऱ्यांना जाणवत नव्हती. याचा आणि मागासलेपणामध्ये भारतीय शेतकी अर्थव्यवस्थेचा ऱ्हास याचा अधिक सरळसरळ संबंध आहे. आरंभीच्या कालखंडातील आधुनिक युरोपीय राज्यसंस्था, १९व्या शतकातील मेइजी राजवट आणि विसाव्या शतकाच्या सातव्या व आठव्या दशकातील आग्नेय आशियातील राष्ट्र-राज्ये यांनी 'आधुनिक' आर्थिक विकास शक्य करणारे प्रकल्प जाणतेपणी वा अजाणतेपणी हाती घेतले. त्यांमधून आधुनिक आर्थिक विकास घडून आला. या उलट, युरोपातील राष्ट्र-राज्यांमध्ये आपापसांमध्ये जशी चुरस होती तशी स्थिती येथे नसल्याने, भारतातील वासाहतिक राजवटीने पालकत्वाच्या भूमिकेमधून अर्धवट उपाययोजना केल्या. त्यांमधून अविकसन-शील, मागासलेपणाची समस्या उत्पन्न झाली. इंग्लंडला पाठवावयाच्या पैशाचा ओघ ('home charges') सुरळीत बिनतक्रार चालू ठेवणे ही येथील राजवटीची नेहमीच मुख्य चिंता राहिल्याने पेच अधिकच बिकट बनण्यास मदत झाली. १९व्या शतकाच्या अखेरीस कर्जांवरील व्याज आणि 'होम चार्जेस' यांचे प्रमाण भारताच्या चालू महसूली उत्पन्नाच्या सुमारे १६ टक्के एवढे होते. ते १९३३ साली ३३ टक्क्यांपर्यंत वाढले. १९३० च्या दशकात भारतीय उपखंडामधून इंग्लंडला पाठविल्या जाणाऱ्या मिळकतीचे प्रमाण इंग्लंडच्या एकूण नक्त 'छुप्या उत्पन्ना'च्या ('invisible earnings') १५-१६ टक्के एवढे होते, आणि पौंड चलनाचे स्थैर्य कायम राखण्यात या उत्पन्नाचा मोठा हातभार होता. जागतिक पातळीवरील आर्थिक विकासाच्या एका महत्त्वपूर्ण टप्प्यावर, बहुतेक इतर विकसित राष्ट्रांशी तुलना करता, आधुनिक आर्थिक विकासाला चालना देणे भागच असणारी राज्यसत्ता भारतात सत्तेवर नव्हती.

**विभाग पहिला**

१८व्या शतकातले येथील राजकारण समजून घेण्यासाठी उपयोगी मध्यवर्ती संकल्पना म्हणून आंद्रे विंक (Andre Wink) या अभ्यासकांनी 'फितना' ('fitna') ही संकल्पना विकसित केली. तिथून आपण सुरुवात करू. भारतीय राज्यसत्तेची सम्यक् समज उत्पन्न होण्याच्या दृष्टीने केवळ भौगोलिक प्रदेश हाच एक मुख्य घटक म्हणून विचार करणे पुरेसे नाही असे विंक यांचे प्रतिपादन आहे. लोक आणि भूमी यांचा एकत्रित विचार करणे गरजेचे आहे; कारण भूमीच्या संबंधात लोकांचे मालकीहक्कविषयक हितसंबंध खोलवर गुंतलेले होते, असे

अनुक्रमणिका

त्यांचे म्हणणे. या हक्कसंबंधांवरून लोकांमध्ये सतत कलह, व परस्परांवर मात करण्यासाठीचे डावपेच व राजकारण चालत असे. जमिनीवर वतनी हक्क प्रस्थापित करण्यासाठी चालणाऱ्या या कलहांमध्ये हस्तक्षेप करून ते स्वत:च्या सत्तेला लाभदायक ठरतील अशी त्यांची हाताळणी व सोडवणूक करण्याची संधी वरिष्ठ पातळीवरील सार्वभौम राज्यसत्ता तत्परतेने घेत असे. स्वत:च्या राज्याचा विस्तार करण्याच्या उद्योगात त्यावेळची राज्ये सतत गुंतलेली असत, आणि या दृष्टीने आक्रमक राज्यसत्तेच्या विस्ताराच्या दृष्टीने स्थानिक पातळीवर हे कलह हा आघात करण्याचा एक मोठा लाभदायक बिंदू असे. हा हस्तक्षेप यशस्वी झाला की, 'बाहेरच्या', अधिक वरच्या पातळीवरील बलिष्ठ राज्यसत्तेच्या सत्तेचे क्षेत्र तेवढेच विस्तार पावत असे. म्हणून या कलहांमध्ये हस्तक्षेपस्वरूपी पाचर ठोकून त्या कलहाचा स्वत:साठी फायदा करून घेणे हा आक्रमक, जेत्या वहिस्थ राज्यसत्तेचा प्रयत्न असे. पण ही चाल यशस्वी होण्यासाठी राज्यकर्त्यांना स्थानिक परिस्थितीचे बारकावे पक्के माहीत असावे लागत. ज्यांच्या जवळ हक्क असत वा जे हक्कांवर दावा सांगू इच्छित त्यांना विभिन्न स्पर्धकां/विरोधकांच्या बलाबलाचा अंदाज घ्यावा लागत असे. यशापयशाच्या शक्यता अजमाव्या लागत असत. कोणाचे कोणत्या भूमीवर कोणत्या स्वरूपाचे व किती हक्क आहेत याचे काही एक चित्र समोर आल्यावर, जो ते हक्क त्या घडीला उपभोगत असेल त्यावर राज्यसत्तेच्या अधिमान्यतेचे शिक्कामोर्तब करावयाचे वा नव्याने दावा सांगणाऱ्यास ते प्रदान करावयाचे असा पर्याय असे. स्वत:चा निवाडा लादता आला तरच हस्तक्षेप करणारी राज्यसत्ता तिचे सार्वभौमत्व सिद्ध करू शके. वतनी हक्कांवरून ज्यांच्यात झगडे असत त्यांची चाल अशी असे : त्या प्रदेशात परस्परांशी स्पर्धा करणाऱ्या, स्वत:चे सत्तेचे क्षेत्र वाढविण्याच्या खटपटीत असणाऱ्या वरिष्ठ पातळीवर ज्या सार्वभौम राज्यसत्ता असत त्या सर्वांशी, तशी संधी असेल तेव्हा, ही मंडळी संधान बांधून असत. आपले हेतू साध्य करून घेण्यासाठी यांच्यापैकी कोणाचा आपल्याला उपयोग होण्यासारखा आहे यावर त्यांची नजर असे. उलटपक्षी, या उच्चस्तरीय सत्तादेखील कोणाची तळी उचलून धरणे फायद्याचे आहे हा हिशेब मांडून राजकारण करीत. *कोणताही एक प्रदेश घेतला तर तो संपूर्ण प्रदेश पक्केपणाने एकाच सार्वभौम राज्यसंस्थेच्या अधिपत्याखाली स्थिरपणे आहे अशी स्थिती नसे. वतनदार, तशी संधी सापडे तेव्हा, सार्वभौमत्वावर दावा सांगणाऱ्या सत्ताधाऱ्यांचा (सत्तांचा एक गठ्ठाच बाळगीत 'portfolio of sovereigns'). म्हणजे एकाकडून आपला मतलब साध्य होणार नाही असे वाटल्यास, इतरांकडे दादफिर्याद मागता येण्याची तजबीजच एका प्रकारे केलेली असे. सार्वभौम सत्ता हाती आली याचा व्यवहारात अर्थ असा की, वतनदार जेत्या राजपुरुषाच्या पक्षाचे झालेले आहेत.

मात्र, 'फितना' या संकल्पनेमध्ये सामाजिक-आर्थिक चलनवलनाच्या दृष्टीने जे गर्भितार्थ आहेत त्यांची पुरेशी उकल व स्पष्टता विंक यांनी केलेली नाही. वतनदार हे केवळ वतनदार नसत. ते आणखीही वेगवेगळ्या व्यवहारांमध्ये गुंतलेले असत. ते सावकारी करीत, ते बांधकामांची कंत्राटे घेत व मोठ्या संख्येने लोकांना कामाला लावीत, धान्याचा व्यापार करीत वगैरे. आणि तरीही वतनदार ही निर्णायक महत्त्वाची भूमिका असे. कारण जमीनहक्कांवरूनच्या तंट्यात ते स्वत:ची पाचर ठोकू शकत व त्याद्वारा आपल्या स्थावर मालमत्तेत भर टाकू शकत असत. ग्रामीण प्रदेशावर राजाची संपूर्ण पकड बहुधा नसे, आणि या कारणाने जमिनीपासून वा अन्य ग्रामीण संसाधनांपासून वतनदारांकडून राज्याला किती महसुली उत्पन्न होईल ही गोष्ट ग्रामीण भागामधून किती मिळकत हस्तगत करण्याचे बळ वतनदारापाशी आहे आणि वतनदाराशी राज्याचा वरचा अधिकारी वाटाघाट करून काय पटवून घेतो या दोन गोष्टींवर अवलंबून राही.

वतनदार किती मिळकत हस्तगत करू शकतो ही गोष्टी शेतीचे उत्पादन किती व कोणत्या पिकांचे, नव्यानेच लागवडीखाली येणारी जमीन किती, त्या स्थानिक क्षेत्रात कलहांचे प्रमाण व तीव्रता किती (म्हणजे शांतता व स्थैर्य कितपत) आणि (वतनदार व गाव-पाटील यांचा) जाच होऊ

* 'Given a particular coustelltation of these rights, establishing sovereignty was contingent upon being able to guarantee them to the respective holders or to the new aspirants. Holders of land rights generally maintained a portfolio of sovereigns if the opportunity presented. For the sovereign, conquest meant having the watanders on his side'.

लागला तर अन्यत्र स्थलांतर करून जाता येण्याच्या शक्यता किती या घटकांवर अवलंबून राही. १८व्या शतकातील दख्खन-प्रदेशात जमीन विपुल होती तर राबणारे हात यांची टंचाई होती. शिवाय बहुतेक गावांचा महसूल दीर्घ मुदतीसाठी आधीच निर्धारित केलेला असे. या कारणाने अल्पमुदतीच्या बोलीवर जमीन कसायला आपल्या गावच्या शेतजमिनींपैकी जास्तीत जास्त जमीन लागवडीखाली दाखविण्यासाठी निरनिराळ्या गावांमधील पाटीलांमध्ये स्पर्धा असे.* जर मर्यादेबाहेर पिळवणूक होत असल्याचा शेतकऱ्यांचा ग्रह झाला तर गुराढोरांसह आणि अन्य जंगम मालमत्तेसह स्थलांतर करण्यास त्यांना एकप्रकारे प्रोत्साहनच असे. स्थलांतर करून शेतीच्या उत्पादनापैकी फार मोठा हिस्सा सारा म्हणून द्यावा लागण्यापासून स्वतःचा बचाव करण्याची चाल तशी अल्प कालावधीसाठीच परिणामकारक ठरू शकत असे. कारण शेतकरी दीर्घकाल स्वतःचे गाव सोडून राहू शकत नसत. (त्यांचे जमिनींवरील हक्क त्यांना गमवावे लागण्याची टांगती तलवार त्यांच्या डोक्यावर असेच.) अल्पमुदतीच्या करारावर शेती करायला घेण्यासाठी गाव-पाटील शेतकऱ्यांना प्रोत्साहित करीत असले तरी, ज्यांना आपण जमिनी कसावयास देत आहोत त्यांच्या ठायी शेतीतून चांगले उत्पन्न काढण्याची कुशलता असल्याची, ते अर्थातच खात्री करून घेत असत. उपरी शेतकऱ्याने जमीन निकस करून ठेवली तर त्या जमिनीला कसण्यासाठी नंतर पुन्हा मागणी येण्याची शक्यता न उरण्याचा धोका असे. स्थलांतर करून येणाऱ्या शेतकरी-बलुतेदार यांच्याविषयी चांगली व विश्वासार्ह खबर मिळविणे ही त्या काळी सोपी गोष्ट नव्हती; ती महागडी बाब होती. जमीन मुबलक असली तरी ती सगळ्या स्थलांतर करणाऱ्या सर्व गटांना सारख्या प्रमाणात उपलब्ध होत नसे. स्थलांतर करून आलेल्या गटांना उपरी भाडेपट्टीवर जमीन देताना गाव-पाटील बऱ्याच गोष्टींचा विचार करीत असत. नवीन आलेल्या माणसाला शेतीसाठी पुरेसे भांडवल, बैल, नांगर इत्यादी मिळविण्यास अडचणी येत. तेव्हा पाटीलसुद्धा नवीन लोकांना जमिनी देताना सर्वसाधारणपणे ज्यांच्याविषयी खात्री आहे अशांनाच जमिनी देत. त्यामुळे, स्थलांतर करताना सर्वसाधारणपणे लोकांचे गट, जेथे आपली ओळख पटवता येईल - उदा. नातेवाईक जेथे आहेत — अशा ठिकाणी स्थलांतर करीत असत. त्यामुळे आपण चांगल्या प्रकारे शेतीमधून उत्पादन काढू शकतो या मुद्यावरून गाव-पाटीलाचे समाधान करणाऱ्या शेतकऱ्यांनाच नव्याने कसावयास जमिनी उपरी कराराने दिल्या जाण्याची शक्यता असे. इतरांना मिळेल तेथे मोलमजुरीने कामे शोधवी व मिळवावी लागत. ज्या गावातून ते येत त्या गावाची परिस्थिती नेहमीसारखी स्थिरस्थावर होईपावेतो जागोजागी भटकत राहावे लागे.

तेव्हा वतनदार व शेतकरी, दोघांनाही, केवळ बळाचा वापर करून आपले हेतू साध्य करून घेता येत नसत. राजकारणी क्षमता व वाटाघाटींमधील कुशलता वतनदार किती प्रमाणात प्रकट करतो याला महत्त्व असे. राजकीय व्यवस्थापनपटुत्व ज्याच्यापाशी चांगले असे तो आपल्या वतनी क्षेत्रामधून जास्त मिळकत हस्तगत करू शके. संपूर्ण अठराव्या शतकभर, स्थानिक 'पंचक्रोशी' पातळीवर (localities) जमिनीची बहुविध मोजमापे विकसित केली गेलेली व वापरात असलेली आढळतात. 'विघा' म्हटल्यावर त्याचे क्षेत्रफळ सर्वत्र तेच एक आढळेल अशी गोष्ट नव्हती. ('रिवाज बिघा' असा शब्दप्रयोग आढळतो.) ही मापके थोड्या थोड्या अंतरावर आणि एकाच गावात शेतांनुसार तसेच व्यक्तीनुसार बदलत. सारा ठरविण्यासाठी शेताची मोजणी करताना वापरले जाताना 'बिघा' हे मापक लहान शेतकऱ्यांसाठी लहान व मोठ्या शेतकऱ्यांसाठी मोठा असे.[७] हीच गोष्ट धान्याच्या मोजमापांबाबत आढळून येई. जमीन महसुलाची गावाची आकारणी निर्धारित करीत असताना गावामधील बदलत्या अंतर्गत सत्ता समतोलानुसार 'गाव-बिघ्या'चे क्षेत्रफळ कमीजास्त होत असे. प्रत्येक शेतकऱ्याचे उत्पन्न किती याची विश्वासार्ह माहिती प्राप्त करणे ही इतकी खर्चिक बाब होती की, राज्यसत्ता एकेका शेतकऱ्यासाठी सारा ठरविण्याची कटकट टाळण्यासाठी गावाशी एकूण महसूल ठरवून घेई. मग वैयक्तिक शेतकऱ्यांमध्ये त्याचे हिस्से-वाटप करण्याचे काम गावची पाटील व पंच मंडळी यांच्यावर सोपवले जाई. रवींद्र कुमार यांनी असे म्हटले आहे की हिस्सेवाटप शेतकऱ्यांमध्ये समन्यायी पद्धतीने केले जाई. पण उपलब्ध

* १८व्या शतकातील दक्षिण भारतात सुद्धा अशाच प्रकारची, शेतीच्या क्षेत्रात श्रमशक्तीसाठी मोठी स्पर्धा चालत असे. तिचा फायदा जातिव्यवस्थेतील तळाच्या समूहांना कसा होत असे त्याचे विश्लेषण डेव्हिड वॉशब्रुक ह्यांनी केलेले आहे. पहा : वॉशब्रुक, डेव्हिड, 'धि गोल्डन एज ऑफ धि पराया', पीटर रॉब (संपादित), *धि मिटिंग ऑफ लेबर?* ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, इंडिया.

अनुक्रमणिका

दस्तऐवजांवरून त्यांचे हे म्हणणे योग्य असल्याचे शाबीत होत नाही. गावपातळीवरील आकडेवारीच्या विश्लेषणाने त्याच्या उलटच निष्कर्ष निघतात.[८] किंबहुना, मोठे जमीनदार शेतकरी आपल्यावरचा बोजा लहान शेतकऱ्यांवर ढकलून देण्यात यशस्वी होत असल्याचे आढळते. एकेका गावातून महसुलाचे उत्पन्न किती हस्तगत करणे प्रत्यक्षात शक्य होईल ही गोष्ट गावांतर्गत सत्तेचे वाटप व बलाबल कसे असे यावर फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून राही. राज्याचे स्थानिक अंमलदार गावपातळीवर त्यांना असलेल्या या माहितीचा वापर करून वरकड उत्पन्न पदरात पाडून घेऊ शकत. गावशिवारातील लागवडीयोग्य पड जमीन लागवडीखाली आणून वतनदाराला त्याचे उत्पन्न वाढविता येत असे.

तात्पर्य, ही संपूर्ण व्यवस्था, बलाबलाच्या बदलत्या सूक्ष्म समतोलांवर उभारलेली असे. राजकारणी मुरब्बीपणा व कौशल्य अंगी असणाऱ्या साहसी व्यक्तींना सत्तासंपादनाची या व्यवस्थेत संधी होती. ज्याच्याजवळ साधनस्रोतांची अनुकूलता असे तो सत्तेच्या खेळात प्रविष्ट होऊन स्वतःच्या अभ्युदयासाठी त्यांचा वापर करून घेत असे. या सगळ्या व्यवहारामध्ये संभाव्य लाभ फार मोठे असत; यशस्वी व्यक्ती सार्वभौम सत्तेमध्ये वाटेकरी होऊ शकत असे. इतक्या वरपर्यंत ज्यांचे हात पोचत नसत त्यांच्याही पदरात सामाजिक-आर्थिकदृष्ट्या पुष्कळ भरभराट पडत असे. त्यांची प्रतिष्ठा व स्थान उंचावत असे. या सर्व घडामोडींच्या ओघात लहानमोठ्या लढाया होत, स्थानिक पातळीवर उत्पादक साधनस्रोतांची नासाडी होई आणि लोकसंख्या घटत असे, हे निर्विवाद. पण अखेरीस स्थानिक पातळीवर आपले उत्पन्न वाढविण्यासाठी ही सारी उलाढाल चालत असल्याने, स्थानिक साधनस्रोत कायमचे पूर्णपणे नष्ट करणे वा होऊ देणे हे कलहग्रस्त कोणत्याच पक्षाला परवडणारे नसे. बहुतेकवेळा, कलह, कारस्थाने, लढाया यांचा उद्देश प्रतिपक्षाला पाठिंबा देणाऱ्या गटांना आपल्या बाजूस फितवून घेण्याचाच जास्तकरून असे. कलह माजल्यामुळे होणारे नुकसान थोड्याच अवधीत भरून येई, कारण तसे घडून येण्यामध्ये सर्वांचेच हितसंबंध गुंतलेले असत.

अशा रीतीने, १९ व्या शतकातील महाराष्ट्रातील आर्थिक घडामोड समकालीन उत्तर-पश्चिम युरोपियन राष्ट्रांपेक्षा भिन्न का होती हे येथवरच्या विवेचनावरून स्पष्ट होईल.

१९५० नंतर आर्थिक विकासासंबंधी मांडले गेलेले बरेच सिद्धान्त, प्रत्येक अर्थव्यवस्था तिच्या वाढविकासाच्या ओघात काही विशिष्ट टप्प्यांमधून (stage) जाते, असे मानतात. एका विशिष्ट टप्प्यावरून पुढील टप्प्यावर जाण्यास एक ठराविक परिस्थिती निर्माण व्हावी लागते असे हे अर्थतज्ज्ञ मानतात.

डोनाल्ड मॅक्क्लोस्की ह्यांनी अठराव्या शतकातील औद्योगिक क्रांतीमागील कारणांचा आढावा घेण्याचा प्रयत्न करणारा एक महत्त्वपूर्ण लेख लिहिला आहे. ह्या लेखात ते अशा टप्प्यांचे अस्तित्व, त्यांचे विशिष्ट स्वरूप व त्यासाठी लागणाऱ्या पूर्वस्थितीचे वर्णन करणे अशक्य आहे अशा निष्कर्षापर्यंत पोचतात.[९] तर अलेक्झांडर गेर्शेनक्रॉन ह्यांनी असे ठराविक आवश्यक पूर्व टप्पे नसतात असे फार पूर्वीच दाखवून दिले होते.[१०]

आतापर्यंतच्या साहित्यात करण्यात आलेले टप्पे आणि आवश्यक पूर्वपरिस्थितीचे वर्णन हे काही ठराविक राष्ट्रांच्या (बहुतेक वेळा इंग्लंडच्या) आर्थिक इतिहासावरून केले गेलेले आहे. प्रत्येक राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेमध्ये क्रांतिकारक स्थित्यंतर घडून येण्यासाठी अमूक एकच घटक अस्तित्वात असावे लागतात असे नाही, ज्यांचा अभाव आहे त्यांची भरपाई करणारे नवे घटक त्यांची जागा घेतात. स्थित्यंतराचे टप्पे व त्यासाठी 'अत्यावश्यक घटक' या प्रकारच्या सर्व मांडण्या या काही विशिष्ट राष्ट्रांच्या ('बहुतेकवेळा इंग्लंडच्या') आर्थिक विकासाचे उदाहरण डोळ्यासमोर ठेवून केलेल्या असतात; प्रत्येक राष्ट्राची आर्थिक वाढविकासाची वाटचाल एकमेवा-द्वितीय राहिली असल्याचे तथ्य आज अभ्यासकांमध्ये मान्यता पावत आहेत. 'टप्प्यां'च्या सिद्धांतनात औद्योगिकीकरणासाठी आधी शेतीमधील स्थित्यंतराचा टप्पा ओलांडलेला असायला लागतो अशी मांडणी केली जात आली. आणि औद्योगिकीकरण म्हणजे आधुनिक आर्थिक विकास असे समीकरणही मांडले गेले. इंग्लंडमधील 'औद्योगिक क्रांती'चा हा एकमेवाद्वितीय विशिष्ट क्रम राहिला पण युरोपीय राष्ट्रांपैकी सर्व राष्ट्रांमध्ये-देखील आर्थिक विकासाची प्रक्रिया याच टप्प्यांनी घडून आलेली नाही हे तथ्य आज आर्थिक इतिहासकारांमध्ये सर्वमान्य आहे.[११] कोणत्याही देशात व भूप्रदेशात सामाजिक संस्था व संरचना कशी आहे आणि पर्यावरणीय संभाव्यता व साधनस्रोत काय आहेत यानुसार आर्थिक प्रलोभने व विभिन्न पर्यायांमध्ये असलेल्या नफ्यातोट्याच्या, परताव्याच्या शक्यता/संधी यांची एक व्यूहरचना

अनुक्रमणिका

समोर येते, आणि त्यामधून तो तो देश व भूप्रदेश यांच्या वाढविकासाचा खास त्या देश-प्रदेशाचा मार्ग, टप्पे ठरतात असे म्हणणे संयुक्तिक होईल. जास्तीत जास्त इतके म्हणता येईल की, ज्या देश-भूप्रदेश यांच्या सामाजिक संस्था-व्यवस्था आणि पर्यावरणीय साधनस्रोत व संभाव्यता (potentialities) या तुल्यबल आहेत वा एकाच धाटणीच्या आहेत त्यांच्याबावतीत आर्थिक वाढविकासाची स्थित्यंतरे, स्थूलमानाने, त्याच टप्प्यांनी व मार्गाने होण्याची शक्यता अधिक. या कारणाने, प्रत्येक राष्ट्राचा आर्थिक विकास 'संरजामशाहीकडून भांडवलशाहीकडे' किंवा 'कृषिप्रधान अर्थव्यवस्थेकडून औद्योगिक अर्थव्यवस्थेकडे' असाच होईल वा व्हावा ही अपेक्षा फोल आहे.

भारतासारख्या देशांचा, समाजांचा प्रवास 'पारंपरिक ते आधुनिक' असा झाल्याचे, होत असल्याचे म्हटले जाते. या मताबद्दलही काहीशी अशीच गोष्ट आहे. माणसे जात-जमात, गोतावळा यांच्या कोंदणात बंदिस्त असत, ती व्यक्तिनिष्ठ विचार करू शकत नसत वा त्यानुसार वर्तन करू शकत नसत, असे म्हटले गेले आहे. ऐहिक अभ्युदयाविषयी — म्हणजे सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा संपादण्याविषयी — भारतीय माणसे उदासीन असत, कारण वैराग्य व मोक्ष या आध्यात्मिक संकल्पनांची मनावरील कमालीची पकड व त्यांना पोषक संस्था, रीतीभाती व संस्कार, अशीही मांडणी केली गेली आहे. पण तत्कालीन राजकीय-आर्थिक व्यवहारांविषयी जी कागदपत्रे आपल्या समोर येतात ती या धारणांना मुळीच उचलून धरीत नाहीत. सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा यांच्यात वाढ करण्यासाठी माणसे व्यक्तिनिष्ठ भूमिकेमधून चांगली प्रयत्नशील असत असे आढळते. आता, गोतावळा, जात-जमात, गावकी यांचे बळ स्वतःच्या पाठीशी उभे करण्याकडे अशा व्यक्तींचा स्वाभाविक कल व प्रयत्न आढळत असे, असे म्हणता येईल. पण हा कुशल राजकारणी डावपेच असण्याची शक्यता अधिक.

अठराव्या शतकातील महाराष्ट्रामध्ये ऐहिक उत्कर्षाची महत्त्वाकांक्षा असणाऱ्या व्यक्तीला कोणत्या प्रकारच्या परिस्थितीला सामोरे जावे लागे, हा प्रश्न विचारू या. शेतीचे उत्पादन दर एकरी बेताचेच होते, स्वतःजवळचे साधनस्रोत-भांडवल कोठे व कशात गुंतवणे सर्वाधिक लाभदायक ठरेल याविषयी पुरेशा बारकाव्यांसह खात्रीलायक माहिती मिळविणे ही फार खर्चिक व कष्टाची बाब होती, आणि फितणे-फितवणे यांच्या आधारे चालणाऱ्या सत्तासंपादनाच्या (अगदी राज्य पदरात पाडून घेण्याच्याही) राजकारणात उपलब्ध असणाऱ्या संधी सापेक्षतः अधिक, असे एकंदर चित्र होते. साहजिकच, प्रतिस्पर्ध्यांवर मात करण्यासाठी यशस्वी राजकारण करून राजकीय सत्तेचे क्षेत्र वाढविणे, सत्ता अधिक निरंकुश करणे, अंतिमतः लहानमोठी जहागीर वा राज्य संपादन करणे, या प्रकारच्या राजकीय उलाढालींमधील साधनस्रोतांच्या व कसवांच्या गुंतवणुकीवर सर्वात जास्त परतावा वा लाभ पदरात पडण्याच्या शक्यता नजरेस पडत असल्याने आकांक्षी व कर्तबगार माणसे शेतीचे दर एकरी उत्पादन व उत्पन्न वाढविण्यामध्ये वा वस्तूंचे बाजारांमध्ये विकण्यासाठी उत्पादन करण्यामध्ये जवळच्या साधनस्रोतांची (भांडवलाची) गुंतवणूक करण्याऐवजी राजकारणी उलाढालींमध्ये गुंतवणूक करताना आढळणे स्वाभाविकच म्हणावयास हवे. युरोपीय राष्ट्रांमध्ये राज्यसंस्थेची बांधणी मजबूत झालेली असल्याने ती मोडूनतोडून अभ्युदय साधता येण्याची — म्हणजे, सार्वभौम सत्ता संपादन करण्याची वाट खुली नव्हती. १६व्या शतकात युरोपीय लोकसंख्येमध्ये खूप मोठी वाढ झाली. या वाढलेल्या लोकसंख्येला अन्नाचा व इतर शेतमालाचा पुरवठा करण्यासाठी नव्याने शेतीखाली आणण्या-जोग्या मोकळ्या जमिनी युरोपमध्ये उपलब्ध नव्हत्या. जमिनींचे दुर्भिक्ष्य होते. वहिती-खालील जमिनींचेच दर एकरी उत्पादन वाढविता आले तर, त्या भांडवल गुंतवणुकीमधून चांगला परतावा मिळण्याच्या शक्यता आकर्षक होत्या. शेतीचे उत्पादन झपाट्याने वाढविण्याचे आव्हान हे मध्यवर्ती, निर्णायक आव्हान होते.[१२] या कारणाने साधनसंपत्तीवान, कुशल व कर्तबगार व्यक्तींनी शेतीतून प्राप्त होणारे उत्पन्न वाढविण्यासाठी तंत्रवैज्ञानिक व भांडवली, दोन्ही प्रकारची गुंतवणूक मोठ्या प्रमाणावर केल्याचे आढळते. अठराव्या शतकातील महाराष्ट्राची राजकीय व अर्थोत्पादक पर्यावरणीय व्यवस्था अगदी वेगळ्या अवस्थेत होती. स्थूलपणे, तुल्यबळ असलेल्या राष्ट्र-राज्यांमध्ये सत्ता व संपत्ती यांच्यासाठी सतत चालू असलेली स्पर्धा व यामधून आकाराला आलेली युरोपच्या पातळीवरील राजकीय व्यवस्था युरोपात सतराव्या शतकाच्या मध्यानंतर स्थिर झालेली होती. राष्ट्र-राज्यात्मक चिरेबंदी राजकीय संरचना प्रस्थापित झाल्यानंतर प्रस्थापितांना पदच्युत करून सत्ताधारी बनण्याच्या राजद्रोहाच्या राजकारणात प्रमुख आर्थिक उलाढाल म्हणून भांडवल वा साधनस्रोत गुंतविणे किफायतशीर उरत नाही. असे राजकारण ते करणाऱ्यांच्या अंगलट येण्याचा धोका

वाढला होता. दुसरीकडे, अधिककरून हंगामी पावसावर अवलंबून असलेली जिराईत शेती हे महाराष्ट्राच्या पर्यावरणीय व्यवस्थेचे वैशिष्ट्य. या परिस्थितीत (कोरडा वा ओला) दुष्काळ पडल्यावर भूकबळीने होणारे नुकसान कमी करणाऱ्या सामूहिक रीतिभाती विकसित केल्या गेलेल्या आपल्याला महाराष्ट्रात आढळतात. येथील पर्यावरणाची ही काही वैशिष्ट्ये ध्यानात घेतली तर, शेतीउत्पादनातील वाढावा (surplus) कधीच खूप अधिक राहिला नसणार हे स्पष्ट आहे. शेतीचे उत्पादन वाढविण्यासाठी शेतीत भांडवलगुंतवणूक केल्याने फार काही लाभ पदरात पडणारा नव्हता. उलटपक्षी, राजकीय उलाढालींमध्ये केलेली गुंतवणूक धोक्याची जरूर असे, आणि लाभ काय व किती होणार याची काही शाश्वती नसे; पण नशीब उघडलेच तर मोठे घबाड हाती लागण्याच्या शक्यता याच क्षेत्रात होत्या.

सत्तेचा विस्तार करण्यासाठी केले जाणारे तंत्रवैज्ञानिक व/वा व्यवस्थापनात्मक शोध व त्यांचे उपयोजन या क्षेत्रातील भांडवलगुंतवणूकीचे एक प्रमुख क्षेत्र सैन्य हे असे. या संदर्भात, आर्थर वेलेस्लीने — जो पुढे ड्यूक ऑफ वेलिंग्टन म्हणून प्रसिद्धी पावला व नेपोलियनच्या पराभवाचे श्रेय ज्याला दिले जाते — टिपू सुलतानाचे घोडदळ हे जगातले सर्वश्रेष्ठ घोडदळ असल्याचे मत व्यक्त केले होते ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. छत्रपती शिवाजी महाराजांनी किंवा पहिल्या बाजीरावाने अवलंबलेल्या नवीन लष्करी पद्धती व डावपेच यांच्याबाबत असेच म्हणावे लागेल. याचा अर्थच असा की, सामान्य समज बाळगला जातो त्यानुसार, 'मध्ययुगीय'/ब्रिटिशपूर्व काळातील समाज हा रूढीग्रस्त व गतानुगतिक होता हे म्हणणे यथार्थ नाही, हे तथ्य स्वीकारावे लागते.

आता, अठराव्या शतकातील महाराष्ट्रातल्याप्रमाणेच, युरोपातील काही राष्ट्रांमधील नवोदित बूर्ज्वा मंडळींनी व्यापार-उदीमामध्ये मिळवलेला पैसा, आर्थिक उत्पादनवाढीच्या कामासाठी न गुंतविता राजकीय पद-प्रतिष्ठा प्राप्त करण्यात वा उच्च शासकीय सत्तापदे व अधिकार संपादित करण्यात खर्च केला असे आढळते. या घडामोडीला उद्देशून De Vries या अभ्यासकाने, 'भांडवलाचा घडून आलेला (अनुत्पादक) रक्तस्राव ('haemorraging of capital') असे म्हटले आहे.'[१३]

पण आधुनिक राष्ट्र-राज्याची दृढपणे प्रस्थापना झाली, आणि राजकीय उलाढालींमध्ये - सैन्य उभारणी करून, वा सार्वभौम सत्तेसाठी चाललेल्या राजघराण्यांमधील सुंदोपसुंदीमध्ये एक ना एका पक्षाची तळी उचलून — स्वतःची राजकीय सत्ता वाढविण्यात यश येणे नाही हे स्पष्ट झाले. या टप्प्यावर सार्वभौम राष्ट्र-राज्याने आपली सुदृढता वाढविण्यासाठी जी धोरणे अंगिकारिली व कार्यक्रम राबविला त्यांमधून, नकळत तसेच जाणीवपूर्वक, आधुनिक आर्थिक वाढविकासासाठी कारणीभूत ठरलेल्या उपक्रमांमध्ये-प्रवर्तनांमध्ये (activities) स्वतःजवळचा पैसा गुंतवण्यास अनुकूल असे संस्थात्मक पर्यावरण व संधी धनवान बूर्ज्वा वर्गास अठराव्या-एकोणिसाव्या शतकांमध्ये उपलब्ध होत गेल्या.[१४] उदाहरणार्थ, अठराव्या शतकाच्या मध्यावर नेदरलँड्स मध्ये समुद्र मागे हटवून जमीन संपादित (reclaim) करण्याच्या पवनचक्क्या व संलग्न तंत्रविज्ञानांमध्ये नागर भांडवलदारांनी फार मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतविल्याचे आढळते. किती, तर, डच ईस्ट व वेस्ट इंडिया कंपन्यांची मिळून जेवढी भांडवल उभारणी होती तिच्यापेक्षा ही रक्कम पुष्कळ अधिक होती.

महाराष्ट्रातही, एकोणिसाव्या शतकाच्या आरंभी ब्रिटिश राजवट येथे स्थिरपणे प्रस्थापित झाल्यावर, राजकीय उलथापालथ घडवून आणण्याच्या उपक्रमामधून फार लाभ पदरात पडण्याच्या शक्यता संपुष्टात आल्या. शेतमालासाठी आंतरराष्ट्रीय बाजारपेठही निर्माण झाली, तेव्हा काही पिकांच्या बाबतीत त्यांचे दर एकरी उत्पादन वाढविण्यासाठी भांडवल-गुंतवणूक करण्याची, बुद्धी व कौशल्य वापरण्यास संधी उत्पन्न झाली, चालना मिळाली आणि शेतीउत्पादन वाढण्याने पदरात पाडणारा लाभही वाढला. तेव्हा नगदी पिके घेणाऱ्या अनेक शेतकऱ्यांनी विकेंद्रित पद्धतीने त्यांच्या त्यांच्या जागी उत्पादक सुधारणा शेतीच्या तंत्रांमध्ये व पद्धतींमध्ये केल्या ही गोष्ट आपण विभाग : दोन मध्ये पाहणार आहोत. तात्पर्य असे की, ऐहिक अभ्युदय साधण्याच्या दृष्टीने १८व्या शतकातील महाराष्ट्रातील महत्त्वाकांक्षी व अभिक्रमशील व्यक्ती त्यांच्याजवळचे भांडवल सर्वाधिक परतावा देणाऱ्या उलाढालींमध्ये गुंतवीत. ही गुंतवणूक मग राजकीय उलाढालीं-मधून स्वतःच्या सत्तेची वाढ व विस्तार करण्यामध्ये केली जाणे हे स्वाभाविक होते ही गोष्ट ध्यानात घेण्याची आवश्यकता आहे. उदाहरणार्थ, जमीनदार व सैनिकी अभिजनांपैकी गिर्जोजी यादव या इसमाने कराडची देशमुखी हस्तगत करण्यासाठी त्या काळात राज्यकर्ते भोसले घराण्याला पाव शतकाच्या कालावधीत ३ लाख रूपये वेळोवेळी मिळून दिल्याचे आढळते. यावेळी धान्याचे भाव चढे होते. ८००

शेरांचा भाव ५० रूपये होता.[१५] आणि राजाने बाळगावा अशा आयात केलेल्या जातिवंत अरबी घोड्याची किंमत १४० रु. होती. दर शेकडा दर महिना ५ टक्के व्याजाने पैसे कर्जाऊ दिले जायचे असा हा काळ होता.[१६]

आशियाई राजकीय व्यवस्था या अस्मानीसुलतानी धाटणीच्या एकाधिकारवादी राजवटी होत्या तर युरोपातील १७व्या-१८व्या शतकातील राजकीय चित्र हे परस्परांमध्ये स्पर्धा असणाऱ्या राष्ट्र-राज्यांचे होते, आणि या कारणाने युरोपात भांडवलशाहीचा — म्हणजे औद्योगिकीकरणाचा — उत्कर्ष झाला पण येथे तो झाला नाही, हे पारंपरिक ऐतिहासिक विश्लेषण आपण येथे नाकारतो. भांडवलसंचय असलेली मंडळी, त्यांना जेथे पैसा कमावण्याची जास्त संधी असे त्या युरोपीय राष्ट्र-राज्यामध्ये स्थलांतर करू शकत असत. पण मुसलमानी राजवटींमध्ये व भारतात हे शक्य नव्हते या आशयाचे हॉल या आर्थिक इतिहासकारांचे विश्लेषण चुकीचे आहे.[१७] या प्रकारे स्थलांतर करण्याची संधी येथेही भांडवलसंचय केलेल्या व्यक्तींना असे. आणि साधनस्रोतांचे — वाटप (resource allocation) येथेही आर्थिकदृष्ट्या 'कार्यक्षम'तेने होत असे. राष्ट्र-राज्य ही संरचना प्रस्थापित झालेल्या युरोपात युरोपमध्ये भांडवल गुंतवणुकीसाठी ज्या वाटा/क्षेत्रे उपलब्ध होती त्या वाटा/क्षेत्रे येथे उपलब्ध नव्हती. येथील राजकीय उलाढाल 'फितणे-फितविणे' या भोवती चालत होती, आणि स्थिर असे राष्ट्र-राज्य दख्खनमध्ये प्रस्थापित झालेले नव्हते. सार्वभौम राज्यसत्तेत वाटा मिळविण्याच्या 'उद्योगा'मधून जेवढे आर्थिक लाभ पदरात पडण्याच्या शक्यता येथे होत्या त्यांच्या तुलनेत बाजारपेठांमध्ये विक्री करण्यासाठी वस्तू-उत्पादन करण्यात व व्यापारात पैसा गुंतवणे हे अधिक फायद्याचे नव्हते. आधुनिक धाटणीच्या कारखान्यांमधून वस्तूंचे (उदा. कापडाचे) मोठ्या प्रमाणावर उत्पादन १८व्या शतकातील भारतात होत नव्हते याचा अर्थ भारतीय अर्थव्यवस्था अवरूद्ध झालेली होती असा करणे अयोग्य ठरू शकेल असाही मुद्दा येथे उपस्थित करावयाचा आहे. ज्यांच्यापाशी साधनस्रोत होते, पैसा गोळा होत होता त्या व्यक्ती आणि समूह यांचे आर्थिक वर्तन महाराष्ट्रातही त्याच कसोट्यांवर होत होते. ज्यामध्ये लाभ जास्तीत जास्त होण्याची शक्यता दिसत तेथे भांडवल व साधनस्रोत यांचा ओघ वळत होता. फर्नांड ब्रॉडेल यांच्या मते भांडवली प्रवाहांची लवचिकता युरोपातील नवजात भांडवलशाहीचे एक महत्त्वाचे अंग होते. अठराव्या शतकात महाराष्ट्रात नागर केंद्रे विकास पावत होती, शहरीकरणाची प्रक्रिया वेग धरीत होती. उत्पादन-घटकांच्या (भांडवल, श्रमशक्ती, कौशल्ये इ.) बाजारपेठा आकारास येत होत्या, आणि बाजारातील कमीअधिक संधींवर उभारलेल्या विषमताही मूळ धरीत होत्या. जेथे बाजारपेठ जास्त किफायतशीर व जास्त मोठी उपलब्ध असल्याचे आढळून येत होते तिकडे उत्पादनघटकांचे स्थलांतर होत असल्याचे आंतर-प्रादेशिक चित्र समोर येत होते. सर्वच बाजारपेठी व्यवहार आर्थिक कार्यक्षमतेच्या निकषांवर उतरण्याइतपत कार्यक्षम नव्हते हे खरे. विश्वासार्ह, खात्रीलायक माहिती संपादन करण्याची किंमत फार मोठी होती. बाजार कोसळण्याच्या घटनाही वारंवार घडत आणि खुल्या बाजाराची जागा घेणाऱ्या संस्थात्मक यंत्रणा व रीतीही बाजारांची जागा घेत. खेळत्या भांडवलाची खुली बाजारपेठ प्रस्थापित होण्यात यामुळे विशेष अडथळा उत्पन्न होत होता.

युरोपात केंद्रीभूत राज्यसंस्था भक्कमपणे प्रस्थापित झाल्यावर ती एक व्यक्तिनिरपेक्ष संस्थात्मक रचना बनली. राज्यसंस्था एका कालखंडात व्यापारी हितसंबंधांवर प्राधान्ये-करून उभारलेली होती. (Mercantalist nation-state). अशी राज्यसंस्था कर्जे उभारी तेव्हा ती सर्व उलाढाल औपचारिक स्वरूपाची होऊ लागली.[१८] त्यामधून 'कर्जांची बाजारपेठ' उभी राहिली. दख्खनमध्ये राज्यसत्तेचे सार्वभौमत्व हे चिरेबंदी संस्थात्मक संरचनेत बंदिस्त झालेले नव्हते. त्यामुळे भांडवलदार-सावकारांकडून राजे कर्जे उभारीत तेव्हा तो विवक्षित, व्यक्तिगत व अनौपचारिक व्यवहार राही. स्थानिक पातळीवर कर्जे उभारणीचे व्यवहार संघटित झालेले होते. आणि पुष्कळदा ही सारी व्यवस्था मोडून पडे. राज्यसंस्था उभारण्याच्या प्रक्रियेमध्ये युरोपीय राज्यसत्तांनी राष्ट्राच्या सरहद्दींमध्ये, एका राष्ट्रव्यापी नोकरशाहीकडून राबविले जाणारे राष्ट्रभर लागू असलेले कायदे अंमलात आणण्याची प्रक्रिया घडली. भांडवलपुरवठ्याच्या राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय बाजारपेठा अस्तित्वात आल्या. उत्तर-पश्चिम युरोप हे भांडवल-पुरवठ्याच्या व्यवहारांच्या दृष्टीने एकसंध क्षेत्र यापुढच्या काळात धरले पाहिजे; आधुनिक आर्थिक वाढविकासाच्या संदर्भात केवळ एका इंग्लंडचा विचार करणे बरोबर नाही; सारा उत्तर-पश्चिम युरोप हे एकच एकक धरले पाहिजे, हा युक्तिवाद भांडवली कर्जपुरवठा व व्यवहार या संदर्भात महत्त्वाचा व अर्थपूर्ण आहे.[१९]

अनुक्रमणिका

दखखनमध्ये सार्वभौम राज्यसत्ता कोणती व कोणाच्या हाती होती. हे १८व्या शतकात विवाद्य मुद्दे असल्याकारणाने एका मोठ्या भौगोलिक प्रदेशात सर्वत्र एकसारखे रिवाजही आढळत नसत आणि कायदेकानूंची अंमलबजावणी चोखपणे होत नसे. सर्वाधिक लाभदायक संधी कोणत्या व कोठे उपलब्ध आहेत याचा तपास करण्याची तसेच व्यापारी कायदे/करार करण्याची आणि त्यांची अंमलबजावणी करून घेण्याची, दोन्हींची किंमत फार अधिक होती. राजकीय उलथापालथींची वेगाने फिरणारी चक्रे, आणि व्यवहारांमध्ये गुंतलेल्या मुख्य कर्त्या व्यक्तींचे चलनवलन यामुळे राजकीय अस्थिरता इतकी होती की, बाजारपेठांचे स्थैर्य धोक्यात येई. विश्वास ठेवून दीर्घ मुदतीचे व्यवहार हाती घेता येत नव्हते. आपण एक उदाहरण घेऊ या.

१७६० च्या दशकात मानसिंगराव खेत्री कोकमठाणचा कमाविसदार होता.२० कोकमठाणच्या पाटीलकीत चार हिस्सेदार होते. त्यातील एकाला आपला हिस्सा विकायचा होता. या हिश्श्यावर आणखी कोणता बोजा नाही असे गृहीत धरून सरदार आबाजी पुरंदरे हा हिस्सा रु. ५००० ला खरेदी करण्यास तयार झाले. आबाजींनी विष्णू पातवडे नावाच्या त्यांच्या खास माणसाला हे पैसे देऊन टाकण्यास सांगितले. आवश्यक ती कागदपत्रे तयार करीत असता गावावर सावकाराचे रु. २९६० चे कर्ज असल्याचे लक्षात आले. पातवडेने आबाजींच्या वतीने हे पैसे सावकाराला दिले. त्यानंतर गाव सरकारला पण थकबाकी देऊ लागत असल्याचे लक्षात आले. मामला असा घोटाळ्याचा असल्याचे पाहून आबाजींनी पाटीलकी खरेदी करावयास नकार दिला. पाटीलकीचे कागद तर आबाजींच्या नावे आणि पैसे मात्र पातवडेंनी भरलेले. हे पैसे आबाजींकडून वसूल करणे पातवडेला शक्य नव्हते, असे दिसते. पातवडेंनी गावावर रु. ३५०० ची हुंडी काढली. (सावकाराला दिलेले रु. २९६० + ५४० व्याज) आणि पैशासाठी तगादा करायला सुरुवात केली. गावकऱ्यांनी नारो आप्पाजी तुळशीबागवाले सरदार ह्यांची गाठ घेऊन त्यांना सदर पाटीलकी विकत घेण्याची विनंती केली. तुळशीबागवाले पाटीलकीचे रु. ५००० व सावकाराचे रु. २९६० भरावयास तयार झाले. परंतु गावकऱ्यांनी त्यांना रु. ५४०च्या व्याजाची कल्पना दिलेली दिसत नाही. ह्याच्या आसपास विष्णू पातवडे मरण पावला आणि त्याचा मुलगा बाबूराव पेशव्यांच्या सैन्याबरोबर उत्तर हिंदुस्थानात गेला, तो दोन-तीन वर्षे परतला नाही. ह्याच वेळेस पेशवे आणि नारो आप्पाजी ह्यांच्यात मतभेद निर्माण झाल्यामुळे नारो आप्पाजींनी काही काळ प्रशासकीय कारभारातून अंग काढून घेतले. बाबूराव आणि मानसिंगराव खेत्री उत्तर हिंदुस्थानातून परत आले आणि नारो आप्पाजींना जाऊन भेटले. गावकऱ्यांनी सरकारचे देणे फेडल्यास पाटीलकीचा चौथा हिस्सा खरेदी करण्यास नारो आप्पाजी तयार झाले. तेवढ्यात मानसिंगराव सदाशिवराव-भाऊंसोबत आधी दक्षिणेला व मग पानिपतला मोहिमेवर गेला आणि पानिपतच्या युद्धात बेपत्ता झाला. पानिपतला जाताना तो पाटीलकीचे कागदपत्र सोबत घेऊन गेल्यामुळे ते कागदपत्रही गहाळ झाले. कागदपत्र नसल्यामुळे नारो आप्पाजींनी पाटीलकी खरेदी करण्यास पुन्हा नकार दिला. नंतर पेशव्यांच्या आणि नारो आप्पाजींमध्ये काही तडजोड झालेली दिसते. कारण पेशव्यांनी नारो आप्पाजींचे मन वळविले आणि नारो आप्पाजी पाटीलकी खरेदी करण्यास तयार झाले. हे जुने कागदपत्र सादर करून नारो आप्पाजीच्या हक्कात पुढे कधी आपण बाधा करणार नाही अशी शपथ कुलस्वामिनीला साक्षी ठेऊन बाबूराव पातवडेने घेतल्यावर हा व्यवहार पार पडला.

कोकमठाणची पाटीलकी विकायला एक व्यक्ती आणि विकत घ्यायला दोन व्यक्ती तयार असताना सुद्धा ह्या व्यवहारात अनेक अडचणी आलेल्या दिसतात. पुरेशा खात्रीशीर माहितीचा अभाव, आबाजी पुरंदरेसारख्या माणसाला करार पाळण्यासाठी भाग पाडण्यात आलेले अपयश, पेशवे व आबाजी पुरंदरे यांचे मध्ये बिघडलेले व नंतर पुन्हा सुरळीत झालेले संबंध, कागदपत्रे नष्ट होणे, बाबूराव व मानसिंग यांची भटकन्ती व अनुपस्थिती इत्यादी अनेक अडचणी दिसतात. बाबूराव पातवडेला कुलस्वामिनीची साक्ष काढावी लागली, हे पण आपण पाहिले. परंतु ह्यातून, आर्थिक व्यवहारांवर धार्मिक अंधश्रद्धांचा पगडा होता, हा निष्कर्ष आपल्याला काढता येणार नाही. पाटीलकीची खरेदी ही दीर्घकालीन गुंतवणूक होती. ह्या गुंतवणुकीच्या सुरक्षिततेसाठी, बाबूराव पातवडे गुंतवणुकीला बाधा येईल असे काही करणार नाही, ह्याची हमी नारो आप्पाजींना हवी असणे साहजिकच होते. साधारणतः पाटीलकीच्या कागदपत्रांनी अशी हमी दिली असती. परंतु कागदपत्रे गहाळ झाल्यामुळे देवीच्या शपथे-सारख्या, ज्यांना आपण 'आधुनिकपूर्व' म्हणू अशा साधनांची गरज कागदपत्रांचा

तुटवडा भरुन काढण्यासाठी भासली. पुष्कळदा अपुरी माहिती, कागदपत्रे हाताशी नसणे इत्यादी घटक सर्व व्यवहारांच्या आड येत राहत असा तो काळ होता. मरण पावलेल्या वा बेपत्ता झालेल्या महत्त्वाच्या व्यक्ती आपणच आहोत असा दावा करणारे तोतये उपस्थित व्हावयाचे. कोणाची जात कोणती हे निश्चित करणे, जन्म, मृत्यू वा विवाहित/अविवाहित दर्जा इत्यादी तपशीलांवरून वाद उपस्थित व्हायचे. अशा वेळी, अडचणी दूर करून व्यवहार पुरता करता यावा या साठी 'सत्य प्रस्थापित' करणारी विधी-कृत्ये, रीती प्रमाणित कराव्या लागत. माणसांना नाना प्रकारची दिव्ये करण्यास त्या काळी सांगितले जाई त्यामागे ही, अडचणींवर मात करून व्यवहार पूर्ण करण्याची गरज व निकड राहिली असावी. एरवी 'बाजारपेठ' — देवीघेवीचे व्यवहार करण्याची जागा — तिचे कार्य पार पडू शकली नसती.

डॉ. धनंजयराव गाडगीळ यांचा अभिप्राय असा की, अठराव्या शतकातील महाराष्ट्रात केवळ व्यापार करणारा महाराष्ट्रीय व्यापारी वर्ग आढळत नाही.[३१] १८व्या शतकातील व्यावसायिक व्यापारी व सावकार ही दख्खनमध्ये बाहेरून आलेली मंडळी होती असे तत्कालीन कागदपत्रांवरून दिसून येते. संदर्भ लक्षात घेऊन समकालीन कागदपत्रांचा अर्थ लावण्याचा हा मुद्दा आहे. वस्तुस्थिती अशी आढळते की, ज्यांच्यापाशी धनाचा संचय होत असे ते सावकार, शेतमालाचा व्यापार यांमध्ये पैसा गुंतवीत असत. त्याचवेळी जमिनींवर मालकी/वतनी हक्क प्रस्थापित करण्याच्या राजकारणात ते पैसा गुंतवीत. त्या काळातली राज्यसंस्था ही खुली व अनेकस्तरीय होती, आणि राज्यसत्तेत हिस्सेदारी प्राप्त करण्यासाठी तसेच नेहमीच्या व्यापारी व सावकारी व्यवहारांमध्ये भांडवलसंचयाचा वापर केला जात असे, हे ध्यानात घेतले पाहिजे. सामाजिक-आर्थिकदृष्ट्या प्रतिष्ठा, मत्ता व सत्ता यांचा सोपान चढून जाण्यासाठी धडपड असे. भांडवल गुंतवून स्वतःसाठी देशमुखी व कुलकर्णी वतने मिळविण्यासाठी त्यांचा विशेष कल होता. कागदोपत्री हे लोक आपल्याला व्यापारी किंवा सावकार म्हणून न दिसता देशमुख व कुलकर्णी म्हणून भेटतात. ह्याउलट स्थलांतर करुन आलेले गुजराती किंवा मारवाडी व्यापारी आणि सावकार ह्यांना स्थानिक राजकारणात स्थान नसल्यामुळे ते केवळ व्यापारी किंवा सावकार असल्याचे दिसून येते.[३२] काशी रंगनाथ वरपे ह्यांचे व्यवहार वरील मुद्याचे उदाहरण म्हणून आपल्याला पाहता येतील.[३३] काशी रंगनाथ वरपे आपल्याला १६८० च्या आसपास जावळीचा 'देशकुलकर्णी आणि लेखक' म्हणून पहिल्यांदा भेटतो. नंतर २०.४.१६८९ रोजी केलेल्या राजारामाच्या इनामपत्रात स्वामींच्या पायाशी निष्ठावान असलेला जुना सेवक असा त्याचा उल्लेख येतो. पन्हाळ्याच्या वेढ्यात राजाराममहाराजांची सेवा केल्याबद्दल त्याला साववणे गाव इनाम दिल्याचा उल्लेख ह्या इनामपत्रात आहे.[३४] १६९३ साली वरपेला मलकापूर जवळ एक चवार जमीन ह्याच कारणासाठी इनाम दिली गेली.[३५] म्हणजेच ह्या चार वर्षांत मराठी राज्यसत्तेला वरपेच्या मदतीची गरज भासतच राहिली, असा अर्थ निघतो. ह्याच दरम्यान १६९१ साली वरपेने कोल्हापूरनजीक आकुर्डे गावचे कुलकर्णी वतन १७५ रुपये घेऊन खरेदी केल्याचा उल्लेख आहे.[३६] हे कुलकर्णी-वतन तीन हिस्सेदारांच्या ताब्यात होते. सरकारी थकबाकी वाढल्यामुळे ह्या हिस्सेदारांनी सदर वतन वरपेला विकत दिल्याचा उल्लेख आहे. म्हणजे, या काळपावेतो (लष्करी कारवाईत भाग घेण्याच्या दृष्टीने) पदरी लोक बाळगणारा, राजकीय लागेबांधे असलेला सधन जमीनदार असामी अशी वरपेची ओळख प्रस्थापित झाली होती. राज्यसंस्थेचा घटक बनण्याची क्षमता असलेला राजकारणी पुरुष.

ऑक्टोबर १६९२ मध्ये वरपेने रायाजी लिंगदेव कुलकर्णी यास रामचंद्र नीळकंठांकडे 'कामाचा माणूस' म्हणून पाठवल्याचा उल्लेख आहे.[३७] रायाजी लिंगदेवास अर्धा चवार जमीन इनाम देण्यात आली. म्हणजेच काशी रंगनाथालाच नव्हे तर काशी रंगनाथाच्या माणसाला पण 'सांभाळावे' इतका काशी रंगनाथ महत्त्वाचा माणूस बनला होता. काशी रंगनाथाला रायाजी लिंगदेवाकडून काय मिळाले ही माहिती आपल्याला उपलब्ध नाही. जुलै १७०६ मध्ये काशी रंगनाथ आपल्याला पुन्हा भेटतो. त्यावर्षी काशी रंगनाथाने बोरगावचे कुलकर्णी वतन भगवंत मल्हार आणि गोपाळ मल्हार ह्यांच्याकडून स्वतःकडे घेतले.[३८] ह्या व्यवहाराची पार्श्वभूमी महत्त्वाची आहे. १६८० च्या मुघल हल्ल्याच्यावेळी भगवंत आणि गोपाळच्या वडिलांनी काशी रंगनाथकडून १०० रु. कर्जाऊ घेतले होते. ह्या नंतर राजकीय धामधुमीमुळे हे कुटुंब बोरगाव सोडून गेले आणि पाच वर्षांनी, परिस्थिती स्थिरस्थावर झाल्यावर, परत आले. बोरगावात सहा महिने राहिल्यानंतर परत सदर कुटुंबाला काशी रंगनाथच्या गावी येऊन स्थायिक होणे भाग पडले.








असे का करावे लागले ह्याची माहिती आपल्याला उपलब्ध नाही. परंतु ह्या वेळी बोरगावच्या कुलकर्ण्यांनी २४०० शेर धान्य उसने घेतले आणि हे कुटुंब कुडाळला निघून गेले. कुडाळ येथे मल्हार भोगनाथ (गोपाळ आणि भगवंत ह्यांचे वडील) ह्यांचे निधन झाले. काशी रंगनाथ तेव्हा राजारामावरोबर वेरुळला निघून गेले होते. त्याने कुडाळला माणसे पाठवून थकबाकीची मागणी केली. तोपर्यंत व्याजासकट कुलकर्ण्यांकडून काशी रंगनाथास ६१४ रु. एवढे येणे होते. कुलकर्णी यांनी ३६ रु. जमा करुन उरलेले पैसे भरण्याची असमर्थता दाखविली. शेवटी अंबाजी तुकदेव आणि सिबाजी तुकदेव ह्यांनी — (काशी रंगनाथासारखीच ज्यांची कारकीर्द राहिल्याचे आढळते — मध्यस्थी करुन पैशांऐवजी बोरगावचे कुलकर्णी-वतन स्वीकारण्यास काशी रंगनाथाचे मन वळविले. क्रयपत्रावर भोवतालच्या १८ गावच्या पाटीलांच्या सह्या आहेत ही गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे. काशी रंगनाथाने बोरगावच्या कुलकर्ण्याला एवढ्या मोठ्या प्रमाणावर धान्य कर्जाऊ दिले ह्याचा अर्थ धान्याच्या व्यापारात (किमान धान्याचा मोठ्या प्रमाणावर पुरवठा करण्यात) काशी रंगनाथाचे काहीतरी स्थान होते, असे समजण्यास हरकत नाही. कदाचित बोरगावच्या कुलकर्ण्यांना सुद्धा ह्या धान्याचा किफायतशीर व्यापार करण्यासाठी वापर करायचा असेल. दुर्दैवाने त्यांना कुडाळला स्थलांतर करणे भाग पडल्यामुळे हा व्यवहार फायदेशीर होऊ शकला नसावा. त्या काळी राजकीय धामधुमीमुळे धान्याचा पुरवठा विस्कळित झाला होता. धान्याच्या किंमती वाढत होत्या आणि त्याचा फायदा घ्यायचा बोरगावच्या कुलकर्ण्यांचा विचार असावा. तसेच काशी रंगनाथ सावकारीचा व्यवसाय करत असे, हे पण स्पष्ट होते. कागदपत्रांवरुन अंबाजी आणि सिवाजी तुकदेवना वतन स्वीकारण्यासाठी काशी रंगनाथाचे मन वळवावे लागले असे दिसते. त्याचे किमान दोन अर्थ निघू शकतात. वर बधितल्याप्रमाणे, एखादे वतन किफायतशीर होते की नाही हे, वतनदार स्थानिक पातळीवर राजकारणाचे नियमन किती कुशलतेने करतो ह्यावर ठरत असे. काशी रंगनाथाने आकुर्डीचे वतन स्वखुशीने खरेदी केले होते. परंतु बोरगावचे वतन मात्र त्याला परिस्थितीमुळे स्वीकारावे लागत होते. कदाचित स्थानिक राजकारण आपल्याला किती यशस्वीपणे करता येईल ह्याची खात्री काशी रंगनाथला नसावी. काशी रंगनाथ आणि तुकदेव बंधू ह्यांच्यात नक्की काय ठरले ही माहिती आपल्याला उपलब्ध नाही. परंतु तुकदेव बंधूसुद्धा काशी रंगनाथाप्रमाणेच 'राजकीय उद्योजक' असावेत, असे वाटते. काशी रंगनाथाच्या वतन विकत घेण्याविषयीच्या नाखुषीच्या वागण्याचा दुसरा अर्थ, बोरगावच्या कुलकर्ण्यांशी होणाऱ्या वाटाघाटीत स्वतःचे स्थान अधिक मजबूत करणे असा सुद्धा निघू शकतो. जानेवारी १७०८ मध्ये काशी रंगनाथ आपल्याला पुन्हा भेटतो तो किल्ले विजयदुर्गचा मुद्राधारी म्हणून.[२९] राजे शिवाजी (दुसरा) यांनी सूर्याजी इंगळे यांच्या जागी काशी रंगनाथची नेमणूक केली. त्यावेळी त्याला स्थानिक पातळीवर उद्भवलेली गडबड मिटवण्याची राजकीय व सैनिकी जबाबदारी दिली गेली होती. मार्च १७०८ मध्ये काशी रंगनाथाचा मुलगा महादजी काशी ह्याचा उल्लेख आढळतो. ताराबाई विरुद्ध पाठिंबा गोळा करण्याच्या कामासाठी शाहूने महादजीस भेटीस बोलावले होते. त्यावेळी महादजी काशी विशाळगडचा कारखानीस होता आणि कृष्णाजी परशुरामाने त्याची शाहूशी 'स्वामीभक्त माणूस' अशी ओळख करुन दिली.[३०]

वरील उदाहरणातून अठराव्या शतकात एकाच वेळी अनेक व्यवसायांत हितसंबंध गुंतलेल्या व्यक्तीचा नमूना आपल्याला दिसतो. अशा व्यक्ती सहसा धान्याचा व्यापार, सैनिकी बळाचा पुरवठा, सावकारी आणि वतनी महसूली हक्काची संपादणूक करताना आढळतात. असे बरेच व्यवसाय करतानाच ह्या व्यक्ती वेगवेगळ्या राज्यसत्तांबरोबर एकाच वेळी संबंध बाळगून असत आणि आपल्या व्यवसायांमधून एकूण परतावा जास्तीत जास्त प्रमाणात वाढविण्यासाठी स्वामीनिष्ठा सोयीप्रमाणे चपखलपणे बदलण्यात वाकबगार असत. नवनव्या वतनांची/पदांची संपादणूक करण्यामधून अशा हिकमती कर्तबगार व्यक्तींची आर्थिक व राजकीय सत्तेच्या अंगाने भरभराट होत असे. राज्यसत्तांना ह्या व्यक्तींची अत्यंत गरज भासे. काशी रंगनाथाच्या उदाहरणामधून स्पष्ट होते की राज्यविस्ताराच्या प्रक्रियेत अशा 'भांडवलदारां'ना राज्यसत्तेत हिस्सेदार बनवून सामील करुन घ्यावे लागे.

दक्षिण आशियातील ब्रिटिश-पूर्व राज्ये वस्तु-उत्पादनात गुंतलेल्या व्यापाऱ्यांना राजकीय स्थान देत नसत असे प्रतिपादन प्रसन्न पार्थसारथी यांनी केले आहे.[३१] त्या काळात विणकरांना भांडवलपुरवठा करणाऱ्या व्यापारी सावकारांचे उदारहण त्यांनी घेतले आहे. कारागिरांच्या उत्पादनावर स्वतःची मक्तेदारी प्रस्थापित करण्याचे ह्या राज्यांचे धोरण असे. यामुळे स्थानिक

राज्यसत्तांशी या व्यापाऱ्यांना स्पर्धेत उतरावे लागे. एतद्देशीय राज्यसत्तांच्या विरोधात ईस्ट इंडिया कंपनी ह्या व्यापाऱ्यांसाठी अधिक प्रमाणात 'सहकार्य' करत असल्यामुळे हे व्यापारी ब्रिटिशांना सामील झाले. पण पार्थसारथींचे उदाहरण एक अतिशय विशेष अशा उत्पादनासंदर्भात आहे. भारतीय कापड ही त्या काळातील आंतरराष्ट्रीय व्यापारातील, प्रचंड मागणी असलेली, मोठा फायदा देणारी वस्तू होती. या निर्यात मालाच्या उत्पादनात व्यापाऱ्यांशी स्पर्धेत उतरण्यासाठी सत्तेच्या जोरावर स्थानिक राज्यसत्ता मक्तेदारी प्रस्थापित करू पहात होत्या. त्यामधून संघर्ष उपस्थित होत होता. कापडाच्या व्यापारातून मिळणारे मोठे उत्पन्न स्वतःच्या हाती यावे असा त्यांचा प्रयत्न असणे समजण्यासारखे आहे. ईस्ट इंडिया कंपनीने व्यापाऱ्यांशी हातमिळवणी करावी ही गोष्टही समजण्यासारखी आहे. ही सोन्याचे अंडे देणारी कोंबडी होती.

१८व्या शतकाच्या उत्तरार्धात इंग्लंडमधील राज्यसत्तेला सुद्धा ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापारातील फायद्यामध्ये वाटा मिळविण्यासाठी कंपनीवर बंधने लादावी लागली आंतरराष्ट्रीय व्यापारी उलाढालीत रुजलेल्या वस्तू व व्यापारी यांचा अपवाद वगळता, पार्थसारथींचे प्रतिपादन अन्य व्यापाऱ्यांना लागू पडत नाही.

मराठा राज्यसत्ता — 'मराठा' हा शब्द जातिवाचक नसून प्रदेशवाचक, भाषावाचक अर्थाने येथे घ्यावयाचा आहे — वस्तू उत्पादनात सरळ सरळ गुंतलेली नव्हती. दख्खनमध्ये पैशाचा प्रचंड ओघ वाहत होता. बाहेरून सर्व प्रकारच्या मालाची पर्याप्त प्रमाणात आयात करण्यासाठी येथील राज्यसत्ता व्यापाऱ्यांवर अवलंबून होती. व्यापारी-सावकार व त्यांची वस्तू उत्पादनातली भूमिका यांच्या आड दक्षिण आशियाई राज्ये येत हे पार्थसारथी यांचे विचार सरसकट लागू करता येत नाही.

ख्रिस्टोफर बेली आणि संजय सुब्रमण्यम ह्यांनी 'Portfolio Capitalist' ही संकल्पना मांडली आहे. स्थानिक शेतीमालाचा व्यापार, सैन्य दलांची उभारणी व पुरवठा करणे, महसूल गोळा करणे यात आणि कधी कधी सागरी आयात-निर्यात व्यापारातही ही भांडवलदार मंडळी गुंतलेली असत.[३२] काशी रंगनाथ वरपेला बहुपदरी भांडवलदार म्हणता येईल का? काशी रंगनाथाचे व्यवहार किती मोठ्या प्रमाणात होत असत ह्याविषयीची माहिती आपल्याला उपलब्ध नाही ही अडचण आहे. काशी रंगनाथसारख्या लोकांना आपले भांडवलदारी व्यवहार यशस्वीपणे करता येण्यासाठी स्थानिक राजकारणात त्यांचे लागेबांधे खोलवर व दूरवर रुजलेले असायला लागत. ह्या उलट १८व्या शतकाच्या उत्तरार्धात बाहेरून आलेले मारवाडी किंवा गुजराथी व्यापारी स्थानिक राजकारणात असे रुजलेले नव्हते. म्हणून हे व्यापारी केवळ व्यापार किंवा सावकारी करीत असत. म्हणून कागदोपत्री हे लोक आपल्याला व्यापारी किंवा सावकार म्हणून आढळतात. तर काशी रंगनाथसारख्या व्यक्ती वरवर पाहता सरंजामी हक्क गोळा करणाऱ्या व्यक्ती म्हणून आढळतात. परंतु बारकाईने पाहिले असता त्यांचे Portfolio Capitalist हे स्वरूप स्पष्ट दिसते. त्यामुळे, गाडगीळांनी काढलेला निष्कर्ष हा वास्ताविक नसून पुराभिलेखागारांमधील कागदपत्रांच्या चुकीच्या वाचनातून काढला आहे, असे म्हणावे लागले.

**टीपा**


१. पहा : पाटणकर, रा.भा., *अपूर्ण क्रांती*, मौज प्रकाशन, मुंबई, पृ. ६५.

२. बेली, सी.एच., *इंडियन सोसायटी अँड मेकिंग ऑफ धि ब्रिटिश एम्पायर*, (केंब्रिज न्यू हिस्टरी ऑफ इंडिया, खंड १, भाग १) केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस (ओरिएंट लाँगमन यांच्या सहकार्याने), १९८८. विशेषतः, 'इंडियन कॅपिटल अँड धि मेकिंग ऑफ कलोनियल सोसायटी' हे प्रकरण पहावे.

३. गुहा, सुमित, 'वुईक स्टेट अँड स्ट्राँग मार्केट्स इन साउथ एशियन डेव्हलपमेंट, १७००- १९७०, *इंडियन इकॉनॉमिक अँड सोशल हिस्टरी रिव्ह्यू*, जुलै-सप्टेंबर १९९९, पृ. ३३५-३५३.

४. कित्ता, पृ. ३४७.

५. विंक, आंद्रे, *लॅन्ड अँड सॉव्हरिन्टी इन इंडिया : ॲग्रेरियन सोसायटी अॅन्ड पॉलिटिक्स अन्डर धि एटीन्थ सेंचुरी मराठा स्वराज्य*, केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, १९८६.

६. हबीब, इर्फान, 'पोटेन्शिॲलिटीज ऑफ कॅपिटॅलिस्ट डेव्हलपमेंट इन धि इकॉनॉमी ऑफ मुघल इंडिया', *जर्नल ऑफ इकॉनॉमिक हिस्टरी*, १९६९.

७. हातेकर, नीरज, 'प्रिंगल्स रिकार्डियन एक्सपरिमेंट इन धि प्री-कलोनियल डेक्कन' *इंडियन इकॉनॉमिक अँड सोशल हिस्टरी रिव्ह्यू*, १९९८.

८. कित्ता.











९. मॅक्क्लोस्की, '१७८०-१८६० ए सर्व्हे', *थि इकॉनॉमिक हिस्ट्री ऑफ ब्रिटन सिन्स १७००*, (संपादन : रॉडरिक फ्लाउड आणि डी.एन. मॅक्क्लोस्की), केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज, १९९४, पृ. २४३-२७०.

१०. गेर्शेन्क्रॉन ए., *इकॉनॉमिक बॅकवर्डनेस इन ए हिस्टॉरिकल पर्स्पेक्टिव्ह*, केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज, मॅसॅच्युसेट्स.

११. कॉर्नर, पॉल, 'इटाली-द इटर्नल लेट कमर, *ॲग्रिकल्चर अँड इंडस्ट्रिअलायझेशन फ्रॉम थि एटीन्थ सेंचुरी टू थि प्रेझेंट डे*, (संपादक, पीटर मॅथिआस आणि जॉन ए. डेव्हिस), ब्लॅकवेल पब्लिशर्स, केंब्रिज, मॅसॅच्युसेट्स, १९९६, पृ. १२९-१४७.
पी.के. ओब्रायन ॲन्ड सी. कायडर, *इकॉनॉमिक ग्रोथ इन ब्रिटन ॲन्ड फ्रान्स*, १७८०-१९१४, लंडन, १९७८.
पी.के. ओब्रायन, 'डू वुई हॅव ए टायपॉलॉजी फॉर थि स्टडी ऑफ इंडस्ट्रिअलायझेशन इन थि नाइनटींथ सेंचुरी', *जर्नल ऑफ युरोपियन इकॉनॉमिक हिस्टरी*, १५, १९८६, पृ. २९१.

१२. यान द व्रीज (Jan de Vries), *थि इकॉनॉमी ऑफ यूरप इन थि एज ऑफ क्रायसिस*, केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, १९७६, पृ. ३६.

१३. कित्ता, पृ. २१४-२१९.

१४. द व्रीज, उपरोक्त, पृ. २३६-२५४; पी. के. ओब्रायन, 'सेंट्रल गव्हर्नमेंट अँड थि इकॉनॉमी, १६८८-१८१५', *थि इकॉनॉमिक हिस्टरी ऑफ ब्रिटन सिन्स* १७००, दुसरी आवृत्ती, (संपादक : रॉडरिक फ्लाइड आणि डी.एन. मॅक्क्लोस्की, केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज, १९९४, पृ. २०५-२४१; पॉल मुंच (Munch), *थि ग्रोथ ऑफ थि मॉडर्न स्टेट, जर्मनी : ए न्यू सोशल अँड इकॉनॉमिक हिस्टरी, खंड २* (१६३०-१८३०), संपादक : शैलान ओगिल्वि, ॲरनॉल्ड प्रेस, लंडन, १९९६, पृ. १९६-२३२; जेम्स बी. कॉलिन्स, *थि स्टेट इन अर्ली मॉडर्न फ्रान्स, न्यू ॲप्रोचेस टू युरोपिअन हिस्टरी*, केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज, १९९५, पृ. १८४-२०४.

१५. *ताराबाईकालीन कागदपत्रे, खंड १*, (संपादक : अप्पासाहेब पवार), शिवाजी विद्यापीठ, १९६९, क्र. १७३, पृ. २३३-२३६.

१६. *ताराबाईकालीन कागदपत्रे, खंड २*, क्र. ६०.

१७. हॉल, जे.ए.; *पॉवर्स ॲन्ड लिबर्टीज*, हार्मन्ड्स्वर्थ, पेंग्विन, १९८६, पृ. १३९-१४०.

१८. द व्रीज, उपरोक्त, पृ. २३६-२५४.

१९. पोलार्ड एस, *पीसफुल कॉन्क्वेस्ट : थि इंडस्ट्रिअलायझेशन ऑफ यूरप* १७६०-१९७०, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, ऑक्सफर्ड; हडसन, पी., *रीजन्स अँड इंडस्ट्रीज*, केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज; क्राफ्ट्स, एन.सी. आर., 'ब्रिटिश इंडस्ट्रिअलायझेशन इन ॲन इंटरनॅशनल कॉन्टेक्स्ट', *जर्नल ऑफ इंटरडिसिप्लिनरी हिस्टरी*, १९, पृ. ४१५-२८.

२०. *भारतीय इतिहास संशोधन मंडळ त्रैमासिक पत्रिका*, पुणे, खंड २४, क्र. १, जुलै १९४९, पृ. ९३-१००.

२१. गाडगीळ ध.रा., *पुणे शहरातील महाजन व नगरशेठ*, गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणे, १९६२, पृ. १५ विशेषेकरून.

२२. व्यापारी-सावकार म्हणून क्रियाशील असलेल्या काशी रंगनाथ वरपे यांची हकीकत हा मुद्दा स्पष्ट करील. वरपे राजकारणात सहभागी होता आणि १८ व्या शतकाच्या पूर्वार्धात कुलकर्णी वतनेही त्यांनी संपादित केलेली आढळतात.

२३. *भारतीय इतिहास संशोधन मंडळ त्रैमासिक पत्रिका*, पुणे, खंड ३०, क्र. १ व २, १९४९, पृ. ३ व १५.

२४. ताराबाईकालीन कागदपत्रे, खंड १, क्र. ३१.

२५. कित्ता, खंड १, क्र. ५२.

२६. कित्ता, खंड १, क्र. ४०.

२७. कित्ता, खंड १, क्र. ४९.

२८. कित्ता, खंड १, क्र. १७३.

२९. कित्ता, खंड १, क्र. १९३.

३०. कित्ता, खंड १, क्र. १९४.

३१. पार्थसारथी, प्रसन्न, 'मर्चंट्स अँड थि राइज ऑफ कॅपिटॅलिझम', *इंस्टिट्यूशन्स अँड इकॉनॉमिक चेंज इन साउथ एशिया*, बर्टन स्टाइन आणि संजय सुब्रमण्यम, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, दिल्ली, १९९६, पृ. ८५-१०४.

३२. सुब्रमण्यम 'एस. आणि ख्रिस्तोफर बेली, 'पोर्टफोलियो कॅपिटॅलिस्ट्स अँड थि पोलिटिकल इकॉनॉमी ऑफ अर्ली मॉडर्न इंडिया', *इंडियन इकॉनॉमिक अँड सोशल हिस्टरी रिव्ह्यू*, राज्यसंस्था, व्यापारी आणि उत्पादक यांचे परस्परसंबंध या विषयावरील विशेषांक, क्र. २५, ४, १९८८, पृ. ४०१-४२४.

⌘⌘









# समुदायनिष्ठ अस्मिता आणि विवेक

वसंत पळशीकर

मी कोण, तू कोण, या प्रश्नांच्या उत्तरांमधून माणसे स्वतःची ओळख करून घेतात, इतरांची ओळख करून घेतात, आणि त्याच वेळी इतरांना आपली ओळख करून देतात.

आता, 'ओळख' आणि 'अस्मिता' या दोन शब्दांच्या अर्थांमध्ये काय फरक आहे असे म्हणता येईल? अस्मिता हा शब्द अलिकडे ज्या प्रकारे वापरला जातो त्यावरून साध्या, सरळ ओळखीच्या पलीकडील काही गोष्टी अस्मितेमध्ये समाविष्ट असतात असे म्हणता येते. अस्मितेचे व्यक्ती वा समूहाला जागरूक भान असते, अस्मिता सामान्यतः आखीव-रेखीव, काटेकोर व कंगोरेदार असते. अस्मिता ठाम व आग्रही असते. पुष्कळदा ती अभिमानाने, गर्वाने मिरवायला माणसांना आवडते. काही वेळा मात्र अस्मिता माणसाला स्वतःविषयी कमालीची अपराधी वाटायला लावते.

अस्मितेत ओळख सामावलेली असते, पण ओळख अस्मितेला सामावून घेऊ शकत नाही. Identity Crisis, Identity politics हे शब्दप्रयोग अलीकडे, पुनःपुन्हा आपणास अलीकडे वाचावयास मिळतात. अस्मितांना कट्टर, आक्रमक, आशय व रंग दिला जातो आणि तिच्याआधारे-सत्तेचे राजकारण केले जाते. हे अस्मितेचे राजकारण. तर कधी कधी आपण कोणती ओळख सांगावी या पेचात माणूस वा समूहही सापडतात, आणि त्यांना रुग्णावस्थाही प्राप्त होऊ शकते.

तात्पर्य, व्यक्तीच्या व समूहाच्या धारणेसाठी व स्वास्थ्यासाठी अस्मिता असण्याला, तिचे या जागरूक भान असण्याला मध्यवर्ती महत्त्व आहे.

अस्मिता कशी आकाराला येते, विवेक आणि अस्मिता यांच्यात काही संबंध असतो का, आणि तो कोणता असणे योग्य ठरेल, या महत्त्वाच्या विषयावर अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान आणि मानवी विकास या विषयांमध्ये सारख्याच आस्थेने व अधिकाराने विवेचन करणाऱ्या नोबेल पारितोषिक विजेते अमर्त्य सेन यांनी ऑक्सफर्ड विद्यापीठामध्ये १९९८ सालचे रोमानेस व्याख्यान (The Romanas Lectures) दिले. *रीझन बिफोर आयडेंटिटी* या नावाने त्याची पुस्तिका ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, नवी दिल्ली, ने (१९९९) प्रसिद्ध केली आहे.

युरोपच्या वैचारिक वाटचालीमध्ये अर्वाचीन कालखंडातील 'एज ऑफ एनलायटनमेंट' व 'एज ऑफ रीझन' अशी, म्हटले तर दोन, पण एकमेकांमध्ये सरमिसळून गेलेली, युगे परिचित आहेत. 'रीझन'च्या — विवेकवाद वा बुद्धिप्रामाण्यवाद यांच्या प्रभावाखाली हळूहळू सारे जग येणार आहे; ते मानवजातीचे नियत भविष्यच आहे. तसे झाले म्हणजे पृथ्वीवर सर्वदूर, सर्व काना कोपऱ्यातली माणसे बुद्धिप्रामाण्यानिष्ठ ('रॅशनल') जीवन जगू लागतील, ती सर्व विवेकवादी वनतील अशी खात्री वाळगली गेली होती. नाना देशींच्या नाना लोकांच्या त्यांच्या त्यांच्या वेगळ्या, वैशिष्ट्यपूर्ण स्थानिक संस्कृती व अस्मिता आकारास येईल अशी धारणा होती. यांच्याशी संवादी असे 'वन वर्ल्ड, वन गव्हर्नमेंट' (वैश्विक राज्यसत्ता व वैश्विक नागरिक) प्रस्थापित होईल हे ध्येयही होते व स्वप्नही. मानवजातीत समाविष्ट लहानमोठ्या जमाती, समाज इ. कोणी पुढे कोणी मागे, कोणी वेगाने कोणी धिम्या गतीने, कोणी उत्साहाने तर कोणी परिस्थितीच्या रेट्याने, पण अटळ नियतीला अनुसरून, त्याच एका राजमार्गावरून वाटचाल करणार होते. आणि, अर्थात्, उत्तर गोलार्धातील प्रगत, गौरवर्णीय राष्ट्रे व त्यांची जगातली इतर भाईबंद राष्ट्रे नेहमीच आघाडीवर व नमूनेदार राहणार होती.

दुसऱ्या महायुद्धानंतर जगात अनेकानेक राष्ट्रांचा उदय झाला. आणि अनेक मोठ्या राष्ट्रांमधल्या पीडित, शोषित व अंकित लोकसमूहांच्या ठायी त्यांच्या हक्कांविषयी जागृती उत्पन्न झाली. आकांक्षा उत्कर्ष पावल्या. यासोबत अस्मितांचाही शोध अधिक तीव्र झाला. आपापल्या वैशिष्ट्यपूर्ण, स्वायत्त, स्वतंत्र अस्तित्वासाठी अस्मितांची जोपासना आवश्यक वाटू लागली. एकीकडे आर्थिक व्यवहारांच्या क्षेत्रात जागतिकीकरण वाढले आणि आंतरराष्ट्रीय राजकीय व्यवस्थाही जास्त घट्टपणे एक होत गेली. त्याच वेळी, दुसरीकडे, या प्रचंड शक्तिशाली

अनुक्रमणिका

रेट्यामध्ये वाहून न जाण्यासाठी राष्ट्रे व लोकसमूह स्वतःच्या वैशिष्ट्यपूर्ण वेगळ्या अस्मितांविषयी आग्रही बनत गेली. एका अंगाने पाहिले तर हा शोध स्वतःच्या अस्सल, सच्चा अस्तित्वाचा शोध होता. इंग्रजीत यासाठी authenticity हा शब्द वापरला जाताना दिसतो. आपण असेही म्हणू शकतो की, आधुनिकतेच्या दिशेने होत असलेल्या वाटचालीत आपण वैश्विक नागरिक, पण बिनचेहेऱ्याचे (faceless) बनून जाण्याचा धोका यांना टाळावयाचा होता. या अंगाने विचार केला तर, हा आत्मसन्मान व प्रतिष्ठा संपादन करण्याचाही शोध असल्याचे म्हणता येते.

या शोधामधून 'मल्टीकल्चरॅलिझम' या नावाने ओळखली जाणारी घडामोड जगभर आकाराला आली आहे. हा आजचा एक मोठा ज्वलंत विषय आहे.

साहजिकच वैशिष्ट्यपूर्ण वेगळ्या, स्वायत्त अस्मितेच्या संवर्धनासाठी आवश्यक व उपकारक अशा धर्म, संस्कृती, जीवनशैली, भूप्रदेशांचे वेगळेपण, शारीर वैशिष्ट्ये (कातडीचा रंग, नाक-डोळे-ओठ इत्यादींची ठेवण) यासारख्या घटकांना महत्त्व व उठाव प्राप्त झालेला दिसतो. 'ब्लॅक इज ब्युटिफुल' हे अमेरिकेतील अँग्लो-अमेरिकनांचे घोषवाक्य बनले. आपापल्या वारशाचा, मूळांचा शोध व पुनर्निर्मिती यांची जोमदार चळवळ उभी राहिली. यामधूनच, गौरवर्णीयांच्या ख्रिश्चॅनिटीचा त्याग करून इस्लामचा स्वीकार करणारी एक चळवळ अमेरिकेत उत्पन्न झाली. मुष्टियुद्धाच्या (बॉक्सिंग) क्षेत्रात ज्याने विलक्षण सिद्धी प्राप्त केली त्याने इस्लामचा स्वीकार करून मुहंमद अली हे नाव धारण केले ही जागतिक प्रभाव पाडणारी घटना होती. गौरवर्णीय प्रॉटेस्टंट व कॅथॉलिक ख्रिश्चन समाजांना चिंतेत टाकणारी ही सारी घडामोड होती. विशेषतः आफ्रिका खंडात ह्या इस्लामचा गेल्या चाळीस एक वर्षांमधील प्रसारही.

राष्ट्रांना आणि लोकसमूहांना आधुनिकपूर्व काळात जायचे आहे का, त्यांना सरंजामशाही राजकीय व्यवस्था पुनरपि प्रस्थापित करावयाच्या आहेत का, त्यांना आधुनिक ज्ञान-विज्ञान, तंत्रविज्ञान यांचा अव्हेर करावयाचा आहे का, जागतिक औद्योगिक-आर्थिक व्यवस्थेचे लाभ टाकून त्यांना त्यांच्या पूर्वीच्या देशी अर्थव्यवस्थांचे व जीवनमानाचे पुनरूज्जीवन करावयाचे आहे का, या प्रश्नांचे उत्तर स्वच्छपणे नकारार्थी आहे.

मग ही सारी घडामोड कशी समजावून घ्यावयाची? हा युरोपात उत्पन्न झालेला विवेकवाद ('रॅशनॅलिझम') नाकारून, प्रबोधन ('एनलायटनमेंट') नाकारून पुन्हा एकवार अप्रबुद्ध, अविवेकाचे राज्य प्रस्थापित करण्याचा हा उद्योग आहे असे म्हणावयाचे का?

याचे उत्तर शोधण्याआधी अमर्त्य सेन यांच्या, वर उल्लेख केलेल्या व्याख्यानाच्या आधारे आपण अस्मितेच्या (Identity) विषयावरून आज उपस्थित झालेल्या वाद-संवादाचा परिचय करून घेणे उपयोगाचे ठरेल.

या वादात दोन ठळक पक्ष आहेत. एका पक्षातल्या लोकांना उद्देशून 'कम्युनिटेरियन्स' (community या शब्दावरून तयार केलेला हा शब्द) असे म्हटले जाते. विरोधी पक्षासाठी 'आधुनिक बुद्धिप्रामाण्यावादी' ('रॅशनॅलिस्ट') हा शब्द वापरता येईल. या शब्दांच्या वापराला युरोपात एकोणिसाव्या शतकात विकसित झालेल्या समाजशास्त्राची पार्श्वभूमी आहे. आधुनिकपूर्व समाज हे आधुनिक समजांमधून — ज्या काही पायाभूत कसोट्यांवरून वेगळे पडतात त्यापैकी एका कसोटीची मांडणी कम्युनिटी आणि असोसिएशन या दोहोंमधील अंतराच्या आधारे केली गेली आहे. ('कम्युनिटी' साठी मराठीत चपखल प्रतिशब्द नाही ही एक अडचण आहे. असो.) मुख्य गोष्ट अशी की, इतिहासक्रमात परंपरेच्या आधारे पूर्वापार समाजांची जडणघडण होत आली. अमुक-तमुक तत्त्वे, उद्दिष्टे, यम-नियम यांच्या आधारे समाजाची स्थापना करावयाची, व्यवस्था उभी करावयाची असे ठरवून समाज अस्तित्वात आले नाहीत. विभिन्न समाजांमध्ये जी पृथगात्मता, विविधता, वैशिष्ट्यपूर्ण वेगळेपण आढळते त्याला कारणीभूत असणारे वेगवेगळे घटक सांगता येतात; — उदा. भाषा, पोशाख, खानपान, रूढी, रीतिभाती, सामाजिक रचना — संस्था इ. — पण 'रीझन'चा (बुद्धी वा विवेकशक्ती या मानवी क्षमतेचा) वापर करून वेळोवेळी ठराव करून बुद्ध्या, तर्कनिष्ठ राहून केलेली वाटचाल असे म्हणता येत नाही. याउलट, आधुनिक समाजाची स्थापना एका सामाजिक कराराद्वारे काही विशिष्ट तत्त्वे-उद्दिष्टे यांच्या आधारे केली गेली, आणि तो 'रीझन'चा आविष्कार आहे असे मानलेले आहे. स्वतःचा स्वार्थ सर्वात चांगल्या प्रकारे कसा साधता येईल, या प्रश्नाला दिलेल्या बुद्धिप्रामाण्यनिष्ठ उत्तरांमधून आधुनिक समाजव्यवस्था, राज्यव्यवस्था व अर्थव्यवस्था उभारलेल्या आहेत ही मान्यता आहे. 'असोसिएशन' म्हणजे आपले स्वार्थाधिष्ठित विशिष्ट हितसंबंध साधण्यासाठी एकत्र येऊन व्यक्तींनी विशिष्ट घटनेनुसार ('कॉंस्टिट्युशन') स्थापन केलेली, नियमांनुसार चालवलेली सभा-संस्था.

अनुक्रमणिका

माणूस हा जात्याच समाज करून राहणारा प्राणी आहे, हे उभय पक्षांना मान्य आहे. तसेच, समाज हा व्यक्तींचा बनलेला असतो हेही उभय पक्षांना मान्य आहे. पण 'समुदायवादी' ('कम्युनिटेरियन्स'साठी हा शब्द आपण वापरू या) असे मानतात की व्यक्ती येतात-जातात पण समुदायाला एक स्वतःचे व्यक्तित्व व सातत्य असते. इतिहास-परंपरा या आधारे या दोन्ही गोष्टी आकाराला येतात.

अस्मिता व्यक्तीला एक ना एका गोतावळ्यामध्ये, समुदायामध्ये राहण्यामधून प्राप्त होते. तीही जगण्याच्या ओघात, बऱ्याच अंशी अजाणता, व्यक्तीला स्वतःची प्राथमिक ओळख ती ज्या कुटुंबाचे अपत्य असते त्या कुटुंबापासून प्राप्त होते. दत्तक घेतल्या जाणाऱ्या मुलांचेही आपण उदाहरण घेऊ शकतो. पण अस्मिता ही अधिक मोठ्या गोतावळ्याबरोबर सामायिक असते, ती या अर्थाने सामाजिक/सामुदायिक असते. sharing an identity, the idea of identifying oneself with others of a particular group असे आपण इंग्रजीत म्हणतो. एका बृहत् गोतावळ्यामध्ये, समुदायामध्ये, लोकांमध्ये लहानाचे मोठे होण्याच्या ओघात जर व्यक्तीला अस्मिता प्राप्त होत असेल तर आपण असे समजू शकतो की अस्मितेच्या जडणघडणीत 'बुद्धिप्रमाण्यावादी भूमिके'चे उपयोजन केले जाण्याचा संबंध येत नाही.

आधुनिक अर्थशास्त्रज्ञ या नात्याने अमर्त्य सेन एक प्रश्न आरंभीच उपस्थित करतात. कोणत्या उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी प्रयत्न करावेत आणि कोणती निवड करावी हे ठरविताना व्यक्ती एकटी, स्वतःच निर्णय करते की तिचे निर्णय इतरांशी एकरूप होत केले जातात? आधुनिक अर्थशास्त्रातली पुष्कळशी सैद्धांतिक मांडणी, व्यक्ती एकटीच निर्णय करते या गृहीतकाच्या आधारे केली जाते. 'स्वार्थाला वाहिलेली व्यक्ती' हे आजच्या मुख्य प्रवाहातील अर्थशास्त्राच्या गाभ्याशी असलेले गृहीतक आहेत. मानवी वर्तनाचे तसेच बाजारपेठी अर्थ-व्यवस्थांतील कार्यक्षम व्यवस्थापनाचे पर्याप्त स्पष्टीकरण या गृहीतकाच्या आधारे हाती येते असे मानले जाते. याची नोंद सेन घेतात. ॲडम स्मिथ या आधुनिक अर्थशास्त्राच्या जनकाचे मत हेच होते, या गृहीतकाचा उगम स्मिथमध्ये सापडतो असे मानले जाते; पण वस्तुस्थिती तशी नाही. सामाजिक जाणीव, इतरांविषयी सहानुभाव, औदार्य, इतरांच्या संदर्भातील जबाबदारी, एकत्र उत्पादक कार्ये पार पाडत असताना परस्पर सहकार्य, सहभाव ही सर्व नैतिक मूल्ये व प्रेरणा यांचे महत्त्व ॲडम स्मिथने आवर्जून नोंदवले असल्याचे सेन स्पष्ट करतात. परस्पर विश्वास व स्वअनुशासन, शिक्षा यांचीही गरज असते.

एक ना एका समुदायाशी स्वतःची एकरूपता वा तादात्म्य अनुभवणारी सामाजिक अस्मिता हा निःस्वार्थी मूल्ये व वर्तन यांचा मूळ स्रोत म्हणता येतो का? समाजाची धारणा यांच्या मुळेचशक्य होते असे म्हणता येते का? सेन म्हणतातः "Indeed, both in reflective choice and in evolutionary selection of behavioural modes, ideas of identity can be important...it is hard to resist the understanding that social identity is a significant influence on human behaviour."

सेन पुढे जे म्हणतात ते अस्मितेच्या विषयाच्या संदर्भात अधिकच महत्त्वाचे आहे. 'These are strong influences of the community, and of the people with whom we identity and associate, in shaping our knowledge and comprehension as well as our ethics and norms. In this sense, social identity cannot but be be contrast to human life'. थोडक्यात, समुदायामध्ये आपणास अस्मिता प्राप्त होते, अस्मितेला एक अनिवार्य असे सामाजिक परिमाण असते; आपली समज आणि ज्ञान यांचा आशय, आपण ज्या समुदायात वाढतो, ज्या लोकांसोबत आपली तदेवता अनुभवतो, त्या आधारे आकार धारण करतात आणि नैतिक मूल्ये व कारण आणि कृती-उक्तीची मानके व आदर्श त्यामधून ठरतात. इतके अस्मितेला मानवी जीवनात व व्यवहारामध्ये मध्यवर्ती महत्त्व आहे.

अस्मिताच केवळ नाही तर ज्ञान व समज या गोष्टीदेखील समुदायाकडून माणसाला प्राप्त होत असतील तर मग अस्मितेसंबंधी नीरक्षीर विवेकाचे, चिकित्सक मूल्यमापन व निवड यांचे काही कार्य व स्थान आहे असे म्हणावयाचे की नाही? विवेकशीलता ही समुदायसंबद्ध असते आणि म्हणून विभिन्न समुदायांमधून येणाऱ्या व्यक्तींमध्ये एकमेकांच्या विवेकशीलतेचे चिकित्सक परीक्षण होऊ शकत नाही, आणि ज्या त्या समुदायाची नीतिमूल्ये व नैतिक कृती-उक्ती वेगळीच राहणार, व त्यांच्यात काही बदल वा सुधारणा करता येणे अशक्य असते, व योग्यही नसते असे म्हणावयाचे का? हे



अनुक्रमणिका

प्रश्न सेन उपस्थित करतात. ते म्हणतात, "This question is important in many contexts, including the assesssment of communitarism concepts of rationality (and the corresponding critique of communicable reasoning) and of ethics (including universalizable theories of justice)."

व्यक्ती समुदायात वाढत असताना तिची जाणीव आकार घेते, आणि या जाणीवेच्या आधारेच तिला प्रत्येक गोष्ट समजून घेता येते, ती ज्ञान संपादन करते. हीच गोष्ट नीतीबाबतही आहे. असे असल्यामुळे अशा सर्व गोष्टी समुदायविशिष्ट असतात, आणि बाह्य, वैश्विक कसोट्या लावून वैधता, योग्यता, प्रामाण्य ठरविणे गैरच असते. त्यामुळे उक्ती व कृती यांसंबंधीच्या रीतिभाती, मानदंड, कसोट्या या तो तो समुदाय मानतो, वापरतो त्या मान्य करणेच तेवढे योग्य ठरते. या आशयाचे सिद्धांतन अलीकडे प्रभुत्व व प्रतिष्ठा पावत आहे. ('In many upto-date theories, social identity figures prominently as the principal determinent of people's understanding of the world, their modes of reasoning and conceptions of rationality, their behavioural norms and practices, and their personal moralities and political commitments. And when these theories of people's perceptions and behaviour are combined... with the view that the nature of rationality, knowledge, and morality must be entirely parasitic on the subjects' perceptions, the determining role of social identities is, then, given a commanding role in the deciplines of epestiemology and ethics.")

या भूमिकेचा परिणाम असा होतो की, जात, जमात, धार्मिक-सांस्कृतिक समूह, राष्ट्रीय समाज अशा समुदायांचे बोलणे-चालणे, वागणे, कृत्ये ही त्या त्या समुदायांच्या 'अंतर्गत' अधिकृत मान्यतांनुसार व त्या मर्यादेतच योग्य व अयोग्य ठरतात असे निष्पन्न होते. उदा., पाकिस्तानी अतिरेक्यांनी जर दहशतवादी कृत्यांद्वारे माणसांचे बळी घेतले तर, ते त्या कृत्यांना नैतिक, योग्य, चांगले म्हणत असतील तर आपल्या सामाजिक अस्मितेमधून आपण त्यांचा करीत असलेला निवाडा त्यांनी विचारात घ्यायचे काही कारण उरत नाही. सर्व मानवी समुदायांना समान व सामाईक असे काही नसतेच येथपर्यंत आपण येऊन पोचतो.

यामधून आणखी एक पाऊल पुढे टाकणे अटळ ठरते. कोणतीही एक जमात वा समुदाय घेतला तर त्या समुदायातील व्यक्तींमध्येही मतमतांतरे असतात. पण ज्या त्या व्यक्तीने तिला हवे ते, तिला ते योग्य; विवेकशील व नैतिक वाटत असेल तर — करावे अशी भूमिका समुदाय घेऊ शकत नाही. विशेषतः जर तो धार्मिक वा राजकीयदृष्ट्या संघटित व सत्तावान असला तर, मग अधिकृत व प्रमाण अशी एकमेव प्रणाली जाहीर करावी लागते व ती जबरीने लादावी व अंमलात आणावी लागते. बाकी सगळे वागणे, बोलणे, जगणे पाखंडी ठरवून ते निपटून काढावे लागते. याचा एक मोठा प्रदीर्घ इतिहास जगभर आपल्या परिचयाचा आहे. जात व धार्मिक जमात यांचे या प्रकारचे निवाडे व शिक्षा किती निर्घृण, क्रूर व अतिरेकी असतात याचा भारतात आपणास आजही अनुभव येतो.

सेन म्हणतात, 'There is a tendency here to split up the large world into little islands that are not within normative reach of each other.'

आपण आता भारतातील आजच्या परिस्थितीकडे व पेचप्रसंगाकडे वळू या. भारतातील हिंदू समाज हा आजही जातपातीधिष्ठित आहे; आणि बहुतेक हिंदूंची सामाजिक अस्मिता ही जातीला धरून आहे. यामध्ये सामान्यतः भारतातील आदिवासी जमातींचाही समावेश करता येईल. इतकेच नाही, तर मुसलमान, शीख व ख्रिश्चन या धार्मिक जमातींमध्येही जातवार विभागणी, अलगपणा व उच्चनीचभाव आढळतो, हा आपला अनुभव आहे. ही या देशातील बहुसंख्य व्यक्तींची प्राथमिक, पायाभूत अस्मिता आहे.

याखेरीज आणखी दोन सामाजिक अस्मिता ('सोशल आयडेंडिटिटी) आढळतात. एक प्रदेशाशी संबद्ध. माणदेशी माणसं, वऱ्हाडकडची मंडळी, वैदर्भी, कोकणी या स्वरूपाची. प्रदेश म्हणत असतानाही प्रशासनाच्या दृष्टीने शासनाने जी राज्ये प्रस्थापित केली आहेत त्यांनुसार अस्मिता आढळत नाहीत. कोकणस्थ, देशस्थ या अस्मिता या संदर्भात विचारात घेता येतील. दुसरीकडे गाव व पंचक्रोशी यांच्याशीही अस्मिता संबद्ध असल्याचे दिसते. या पलीकडे धार्मिक व भाषिक

अनुक्रमणिका

अस्मिताही लोकांमध्ये आढळतात. सेन यांचे वर जे वाक्य उद्‌धृत केले आहे ते अंशतः सार्थ ठरते. भारताच्या विशाल जगाचे येथे अस्मितांनी अनेक तुकडे केले आहेत. एखाद्या व्यक्तीची खरी व पूर्ण ओळख पटण्यासाठी तिला तिच्या अनेक अस्मितांचा संदर्भ द्यावा लागेल व लागतोही. इथले चित्र या कारणाने विलक्षण गुंतागुंतीचे, समृद्ध, आणि प्रगल्भ पण आहे. सेन यांच्या वरील वाक्यातील उत्तरार्ध 'not withing normative reach of each other' सर्वस्वी खरा नाही, हेही आपण जाणतो.

भारतात प्राचीनतम कालापासून अनेक लोक आले व येथलेच झाले. कोण कोण आले आणि त्याची सरमिसळ कोणाकोणाशी, कसकशी आणि कोणत्या प्रक्रियेतून झाली याचे पूर्ण आकलन आज आपसाला नाही. जनुकीय कसोटीवर ज्यांना 'शुद्ध' (जेनेटिकली प्युअर) म्हणता येतील असे लोक समूह तुरळकच आहेत. जातपातीच्या आधारे या उपखंडातील अनेकनेक लोकसमूहांची एका बृहत् उपखंडव्यापी समाज-व्यवस्थेत बांधणी झाली त्याला कदाचित तीन एक हजार वर्षे झाली. जातपात, विषमता, उच्चनीच/शुद्ध-अमंगळ भेदभाव यांवर अधिष्ठित ग्रामकेंद्री शेतकी समाजाचे आपण व्यक्तिगत-रित्या व समूह ('जात' - 'जमात' या अर्थाने) पातळीवर घटक-सभासद आहोत ही उपखंडभरच्या विभिन्न लोकसमूहांना, समुदायांना एका बृहत् समाजात एकत्र आणणारी सामायिक सामाजिक अस्मिता तीनएक हजार वर्षांपूर्वीपासून राहिली आहे.' ही मुख्यतः पायाभूत सामाजिक-सांस्कृतिक अस्मिता. याला इतर अस्मिता जोडल्या गेल्या. म्हणूनच, येथे भेद आहेत. विषमता, शोषण, अन्याय आहे, अनेक भाषा व धर्म आहेत, आणि तरीही संवाद आणि एकात्मता आहे. ज्याचा त्याचा व्यक्तिविशिष्ट/भूमिकासंबद्ध स्वधर्म वेगळा, ज्ञातिधर्म वेगळा; पण या सगळ्याच्या पलीकडे सर्वांसाठी एकच असा साधारणधर्मही येथे आहे.

आपापल्या भिन्न-भिन्न सामाजिक अस्मिता असलेल्या समाजांनी बनलेल्या जगात, एकेका समुदायात जशी आत्मीयता व सांघिकता आढळते तशी आढळण्याची अपेक्षा बाळगता येणार नाही. त्यांचे परस्पराशी समंजस व सौहार्दपूर्ण व्यवहार व्हावयाचे असतील, त्यांच्यात दीर्घकालीन मैत्री व सहकार्य प्रस्थापित व्हावयाचे असेल तर, न्याय या तत्त्वाचा/मूल्याचा अंगीकार करावयास हवा. याचे महत्त्व सेन यांनी ठसविले आहे. 'न्याय' या संकल्पनेविषयी जॉन रॉल्स या तत्त्वज्ञांनी अलीकडच्या काळात केलेली सैद्धान्तिक मांडणी प्रभावी ठरली आहे. 'न्याय म्हणजे रास्तपणा' असे त्यांच्या मांडणीचे मध्यवर्ती सूत्र आहे.*

जे माझ्या समुदायाचे आहेत त्यांच्याशी मी समदृष्टी बाळगून वागावे या तत्त्वाचा स्वीकार का केला जातो याचे स्पष्टीकरण, आपल्या जातीजमातीचे, भाषेचे, गाव-पंचक्रोशीची माणसे ही आपली भाईबंद असतात, हे सांगता येते. पण जे आपल्या समुदायाचे नाहीत, ज्यांच्याशी आपला कोणत्याही कारणाने ऋणानुबंध नाही त्यांच्याविषयी न्यायबुद्धी, समत्वबुद्धी का बाळगावी? हा प्रश्न उपस्थित केला जाईल असे अमर्त्य सेन यांनी म्हटले आहे. पण याचे समाधानकारक उत्तर ते देऊ शकलेले नाहीत. दूरदृष्ट्या ती गोष्ट आपल्या फायद्याचीच आहे, असे वागणे धोरणीपणाचे व त्या अर्थाने शहाणपणाचे ठरते, ही उत्तरे पुरेशी नाहीत. कारण जेथे फायदा स्पष्ट दिसत असेल तेथे कोणाकोणाशी शत्रुत्वाने वागावे. कोणाकोणाचे सर्वस्व लुबाडून घ्यावे असेही माणसे स्वार्थाच्या निकषावर ठरवू शकतात.

माणसाचे आणि समाजाचे भले कशात असते, हा प्रश्न व्यक्ती व समुदाय दोन्ही पातळ्यांवर पडतो. 'समाजाचे भले वा कल्याण' ('the social good') ही संकल्पना स्पष्ट करून घेण्यामध्ये, तिचा आशय व परीघ निर्धारित करण्याच्या साठी सामाजिक अस्मितेची एक भूमिका असू शकते. या संदर्भात, राजकीय अस्मितेच्या मुद्याची चर्चा करताना तत्त्वज्ञ चार्ल्स टेलर यांनी म्हटले आहे, "प्रजासत्ताक हा आपण सर्वांचा मिळून आपण राबवीत असलेला उपक्रम आहे या भावनेने नागरिक प्रजासत्ताकांशी तादात्म्य कल्पितो वा अनुभवतो तेव्हा एक सर्वांना समाईक असलेल्या भल्याची/कल्याणाची गोष्ट मान्य करण्याचीच ती कृती असते." ('the identification of the citizen with the republic as a common enterprise is essentially the recognition of a common good.')

---

* जॉन रॉल्स, *ए थिअरी ऑफ जस्टिस* (ऑक्सफर्ड : क्लॅरेंड्स प्रेस, १९७१). रॉल्स यांच्या मांडणीच्या साररूप परिचयासाठी पहा : मे.पुं. रेगे, 'न्याय म्हणजे रास्तपणा', नवभारत, वर्ष ५२, अंक ७, एप्रिल १९९९, पृ. २३-४७.



अनुक्रमणिका

आता, 'भारतीय प्रजासत्ताकाच्या नागरिकत्वाला निष्ठा जो जो वाहील तो तो माझ्या समुदायतला, माझ्या बांधव' असे मी ठरवितो तेव्हा त्या निवडीमागे काही विचार व युक्तिवाद असतो. ही अस्मिता एका लहान समुदायात वाढत असताना प्राप्त झालेली वा परंपरेने प्राप्त झालेली प्रमाण अशी अस्मिता नाही. कारण भारतीय प्रजासत्ताकाची निर्मिती अनेक विभिन्न समुदायांमधील व्यक्तींनी एका राजकीय प्रक्रियेच्या राववणुकी-मधून केलेली आहे.

तसेच, एका व्यक्तीची ओळख/अस्मिता फक्त एकाच स्वरूपाची असत नाही. उदाहरणार्थ, संदर्भानुसार, तीच व्यक्ती महाराष्ट्रीय, मारवाडी, स्त्रीवादी, नाटककार, शाकाहारी, संगीतप्रेमी व अभिमानी मुंबईकर वा पुणेकर असू शकते, आणि या सर्व अस्मिता ती व्यक्ती स्वतःच्या ठायी एकाच वेळी वाळगू शकते. म्हणजे या अस्मितांमध्ये अंतर्गत विसंवाद वा विरोध नाही, त्या परस्परव्यावर्तक नाहीत असा विचार-करून ती व्यक्ती त्या धारण करीत असते. या विभिन्न अस्मितांपैकी कोणत्या अस्मितेला कधी, किती व कसा उठाव द्यायचा वा क्रियाशील वनवावयाचे हे ती व्यक्ती ठरवू शकते.

प्रसंगी स्वतःच निवडलेल्या विभिन्न अस्मितांमध्ये ताण वा संघर्ष उत्पन्न होऊ शकतो. उदाहरणार्थ, मी भारतीय प्रजासत्ताकाचा निष्ठावान नागरिक आहे. पाकिस्तान हे आपले शत्रूराष्ट्र मानून त्या विषयी मनात वैरभाव बाळगावा, अशी वहुसंख्य भारतीयांची भावना आहे व मी पण तीच भावना वाळगावी अशी त्यांची अपेक्षा आहे. पण विश्वबंधुता व शांती ही मूल्ये शिरोधार्य मानणारा अशीही माझी एक अस्मिता आहे, आणि मी पाकिस्तानविषयीही स्नेहभावच बाळगण्याची भूमिका घेतो. पाकिस्तानच्या राजसत्तेचे वागणे शत्रुत्वाचे वैमनस्य वाढविणारे असले, व भारताचे 'शठं प्रति शाठ्यं' या न्यायाचे अधिक आक्रमकतेने त्याच वळणाचे असले तर माझ्या दोन अस्मितांमुळे ताण निर्माण होतो, आणि देशबांधवांपैकी अनेकांच्या भूमिकेशी माझा संघर्षही उपस्थित होऊ शकतो. धार्मिक-सांस्कृतिक बाबीवरूनही असे घडते. उदा. मुस्लिम सत्यशोधकांचा तलाक प्रथेला, मुस्लिमांनी एकापेक्षा जास्त बायका करण्याला असलेला विरोध यावरून मुस्लिम जमातीनेच त्यांना अव्हेरणे, प्रसंगी मारझोड करणे, वा दफनभूमीचा उपयोग करू न देणे असे घडलेले आपणास माहीत आहे. मी एका देशाचा नागरिक आहे किंवा एका संस्कृतीत वाढलो म्हणून मी ती निष्ठा/ अस्मिता न त्यागता मला योग्य व न्याय्य वाटणारी भिन्न धारणा वाळगणे वा निष्ठा विचारपूर्वक जोपासणे याला प्रतिवंध घालण्याचे कारण नाही.

समुदायाकडून जी अस्मिता मला प्राप्त होते व जी माझ्या अंतर्यामी खोलवर मुरवलेली असते तिची एवढी पकड माणसाच्या मनावर वसण्याचे एक कारण असे की, माझी जातजमातीय अस्मिता आदर्श, अधिकाधिक परिपूर्ण स्वरूपात माझ्या व्यक्तिमत्त्वात व जगण्यात मूर्त करण्याचे ध्येय माझ्या मनात रुजवले गेलेले असते. तेच माझे कर्तव्य असते, यात मी काही वेगळा विचार करून व्यक्तिगत काही वेगळी निवड करण्याला सवड नाही, हे मनात विंबवलेले असते. ('Communitarian approaches often tend to acquire persuasive power by making a definitive communal identity a matter of self-relalisation, not of choice.')

उदाहरणार्थ, 'हिंदू' अशी सामाजिक व सांस्कृतिक अस्मिता एका व्यक्तीला प्राप्त झाली आहे. माझ्या ठायी 'हिंदुत्व' मूर्त झालेले मला व इतरांना प्रत्ययाला येणे, यात माझ्या अस्तित्वाचे सार्थक होणार आहे असे माझ्या मनात विंबलेले आहे अशी कल्पना करा. तरीदेखील, 'हिंदुत्व' कशाकशात व साठवलेले आहे आणि ते कसे कसे अभिव्यक्त करावयाचे, हे ठरविण्याचा मुद्दा राहतोच. एकोणिसाव्या व विसाव्या शतकात याची वेगवेगळी उत्तरे दिलेली आपणास दिसतात. स्वामी विवेकानंद, महात्मा गांधी, स्वातंत्र्यवीर सावरकर ही तीन नावे घेतली तरी मुद्दा स्पष्ट होईल म्हणजे विवेक, चिकित्सा व निवड यांना एक महत्त्वाचे कार्य पार पाडायचे राहते. पण, काहीजण असे म्हणतात की, एक मूळ, विशुद्ध व परिपूर्ण असे एकमेव 'हिंदुत्व' आहे आणि ते अपरिवर्तनीय, सनातन आहे. परंपरेने ते आपणापर्यंत पोचवलेले आहे. ते जीवनात उतरावयाचे तेवढे काम करावयाचे आणि हे 'हिंदुत्व' काय ते आम्ही तुम्हाला अधिकृतपणे सांगू.

सेन यांचे म्हणणे असे की, अस्मिता ही गोष्ट, जिची सतत विवेकाच्या आधारे चिकित्सा करीत परिष्कृत करीत राहावी अशी गोष्ट आहे. माझी जातजमात, माझा धर्म, माझी संस्कृती व इतिहास-परंपरा यांनी माझी अस्मिता मूळात आकाराला येते हे खरे. पण आज आपण एक तर, आपल्याच जातजमातीय, राष्ट्रीय-प्रादेशिक, धार्मिक-सांस्कृतिक परिघात

अनुक्रमणिका








जगत नाही. अनेक लोक, देश, संस्कृती, धर्म, परंपरा यांनी बनलेल्या व्यामिश्र विश्वात आपण जगत आहोत. दुसरे, जगण्याची परिस्थिती व पर्यावरण, संसाधने, ज्ञानविज्ञान व तंत्रविद्या यांमध्ये बदल होत आहे, भर पडत आहे. तेव्हा विवेकीचिकित्सा व तिच्या आधारे परिष्करण, विकास ही प्रक्रिया सततच चालावयास हवी. सेन म्हणतात, 'Indeed, our loyalties and self-definitions often oscillate' आणि, एम्मा रॉशशील्ड यांनी म्हटल्यानुसार, 'such oscillation may be a continuous and prized quality of civil society'. तात्पर्य, जे विभिन्न घटक एकत्र येऊन अस्मिता आकार घेत असते त्यातले अनेक घटक कायमचे स्थिर नसतात. आपल्या आस्थेचे विषय, उर्मी, उद्दिष्टे, निष्ठा यांच्यात अंतर पडते, आणि हे बदल ध्यानात घेऊन कोणती अस्मिता मी बाळगावी, म्हणजेच अस्मितेच्या आशयाची व्याख्या मी कशी करावी, हे मी पुनःपुन्हा ठरवायला हवे अशीच गोष्ट आहे.

सामाजिक अस्मितेमध्ये नाट्यपूर्ण बदलही होत असतात. आपण कोण आहोत आणि आपल्या जीवनाचे सार्थक व अस्मितेचे साफल्य कशात आहे, याविषयी अकस्मात 'शोध' लागतो आणि त्यामुळे आपला सारा आलोक बदलतो, पवित्रा बदलतो, वळण बदलते. सेन यांनी रवींद्रनाथ टागोर यांच्या गोरा या कादंबरीच्या नायकाचे — गोराचे — उदाहरण दिले आहे. हिंदू परंपरा व आचारविचार यांचे समर्थन करणाऱ्या गोराला त्याची आई सांगते की, १८५७च्या बंडात बंडखोर त्याच्या आयरिश आईवडिलांना ठार करतात तेव्हा त्या हिंदू कुटुंबाने त्याला आपला मानून त्याचे मुलासारखे पालनपोषण केलेले असते. म्हणजेच तो, वस्तुतः, एक गौरवर्णीयच असतो. मग गोरा गोंधळतो. हे उदाहरण अति-टोकाचे जरी असले तरी स्वतःच्या अस्मितेसंबंधी आपणास 'धक्कादायक' शोध लागत असतात. पण याचा अर्थ अस्मिता जन्मजात वा समुदायाकरवी प्राप्त होणारी गोष्ट असते आणि ती जशीच्या तशी स्वीकारण्याखेरीज आपणास काही गत्यंतर नसते हे खरे नाही. मी भारतीय असते, स्त्री असते, उच्चवर्णीय असते, साम्यवादी असते — अशा माझ्या अनेक अस्मिता असतात व त्यांच्यात एक प्रकारची रस्सीखेच असते. कोणत्या अस्मितेस किती वजन द्यावयाचे, आणि माझ्या विभिन्न अस्मिता कोणत्या अर्थाने स्वीकारावयाच्या, हे मला ठरवायचे शिल्लक राहतेच. म्हणजेच, अस्मितेच्या संदर्भात विवेकपूर्ण निवाडे मी करायला हवे असतात.

मी विभिन्न पर्यायी आशय व आकार यांच्या मधून निवड करू शकत असलो, पण अशी निवड करण्याची सवड नसते अशी माझी पक्की धारणा असली तर, त्या अस्मितेला 'साजेसे' असे चाकोरीबद्ध वर्तन मी आंधळ्या अगतिकतेने स्वीकारण्याची, विवेकाचा वापर न करण्याची घातक शक्यता राहते. असे वर्तन हे उघडउघड नुकसानकारक व अव्हेरण्याच्या लायकीचे आहे हे दिसत असतानादेखील मी चाकोरीनिष्ठ राहतो. स्त्रियांचे गौणत्व, त्यांचे हीनत्व हे समाजमानसात रुजलेले राहते याचे एक कारण, परंपरेने चालत आलेली स्त्रीविषयक धारणा, हे आहे; ही धारणा स्त्रियांच्या मनातही खोलवर रुजलेली असते, असे सेन सुचवितात.

चिकित्सक नजरेने माणसे जेव्हा आपले गतानुगतिकतेने चालत आलेले व्यवहार व रीतीभाती आणि गृहीत धरलेल्या अस्मितांची तपासणी करतात तेव्हा त्यातल्या बऱ्याचशा गोष्टी गळून पडतात; त्या कालबाह्य आहेत, गैर आहेत, नीतीला सोडून आहेत याची उमज पडते.

या ठिकाणी सेन, १९४६-१९४७ साली लोकांच्या अस्मितांमध्ये पाहता पाहता जे अंतर पडले त्याचा स्वतःचा अनुभव सांगतात. १९४६ सालच्या आधीही भारतात कोणी हिंदू होते, कोणी मुसलमान होते, कोणी शीख होते. पण देशाची अखंडता भंग पावणार अशी चिन्हे दिसू लागल्यावर लोकांच्या अस्मितांच्या स्पष्ट आशय-आकारामध्ये एकाएकी बदल झाला. म्हणजे, दुसऱ्यांच्या संदर्भात अस्मिता असहिष्णू, संकुचित, आक्रमक व हिंस्र बनल्या. सेन लिहितात, 'The Carnage that followed had much to do with unreasoned herd behaviour by which peoplem as it were, 'discovered' their new divisive and belligerent identities, and failed to subject the process to critical examination *The same people were suddenly different*.' ('तिरपा ठसा माझा')

येथे सेन यांचे प्रतिपादन भारतातील व जगातील आजच्या स्फोटक, विध्वंसक वास्तवाशी येऊन भिडते. ज्या अस्मितांच्या आधारे आज भारतात सत्तेचे राजकारण चालते त्या अस्मिता 'समुदायाकडून प्राप्त झालेल्या' या कोटीत समाविष्ट असणाऱ्या

अनुक्रमणिका

आहेत. त्या खरे तर परंपरेने चालत आलेल्या ऐतिहासिक-वास्तविक अशा अस्मिता आहेत असे म्हणणे अवघड आहे. उदाहरणार्थ, भारतातील ख्रिश्चन वा मुस्लिम समाज घ्या. त्यांच्यात्यांच्यामध्ये इतके अंतर्गत भेद आहेत की मुस्लिम वा ख्रिश्चन या अस्मिता भारतभर एकचएक नव्हत्या व आजही नाहीत. हीच गोष्ट 'आदिवासी' वा 'दलित' या अस्मितांची आहे. 'दलित' वा 'आदिवासी' ही कागदोपत्रीची, अमूर्त अशी एक कोटी आहे. आणि तरीही, या अस्मितांना राजकारण्यांनी कट्टर, आक्रमक, परस्परव्यावर्तक असे आशय व आकार बहाल केले आहेत. आणि या आशय-आकार यांच्यासह वेगवेगळे घटक-समूह आज त्या अस्मिता आग्रहपूर्वक धारण करीत आहेत.

'हिंदू' ही अस्मिता एका अंगाने कालपर्यंत सर्वसमावेशक होती : म्हणजे असे की, जे मुसलमान, ख्रिश्चन, पारशी, ज्यू, शीख नाहीत ते सर्व स्थूलमानाने हिंदू गणले जात. आज काय बदल घडून येत आहेत? आजवर स्वतःची ओळख 'हिंदू' असण्याला विरोध नसलेले अनेक समूह स्वतःचे अ- हिंदूपण आग्रहपूर्वक प्रतिपादित आहेत. त्याच वेळी, दुसरीकडे, आपल्या विशिष्ट व्याखेनुसार एक कट्टर, आक्रमक व गर्विष्ठ 'हिंदू' अस्मिता जास्तीत जास्त लोकांनी ग्रहण करावी याचे प्रयत्न काही संघटनांनी चालविले आहेत. 'हिंदुत्वा'ची नवीन मांडणी करणारी ही अस्मिता कोणते अमानुष परिणाम घडवून आणू शकते हे अलीकडच्या गुजरातमधील घटनांनी स्पष्ट केले आहे. तर याला समांतर अशी 'मुस्लिम' अस्मितेची मांडणी व जडणघडण जगभर (व भारतातही) केली जात आहे, आणि या अस्मितेची धारणाही असेच अमानुष परिणाम घडवून आणीत आहे.

या नव्यानेच रचल्या जाणाऱ्या समुदायनिष्ठ (communitarian) अस्मिता या मूळ, विशुद्ध अस्मिता आहेत अशी मूलतत्त्ववादी (fundamentalist) भूमिका आग्रहपूर्वक घेतली जाते, पण, वस्तुतः यांची जोडणी आधुनिक काळात राजकीय-सांस्कृतिक हेतू व उद्दिष्टे बाळगून केली गेलेली आहे. 'मूलतत्त्ववादी' भूमिकेचे एक वैशिष्ट्ये हे असते की, ही भूमिका चिकित्सक, विवेकनिष्ठ परीक्षा ठामपणे नाकारते.

'गर्वसे कहो हम हिंदू हैं' अशी स्टिकर्स काही वर्षांपूर्वी जिकडे तिकडे पहावयास मिळत. कोणत्या अर्थाने हिंदू, कोणत्या जातकुळीचा हिंदू असे प्रश्न विचारणे ही स्टिकर्स प्रसृत करणाऱ्यांना संतप्त करणारी गोष्ट होती. विवेक आणि न्याय यांच्या आधारे प्रश्न उपस्थित करणे आणि त्यांच्या आधारे अस्मिता प्रबुद्ध व प्रगल्भ बनविणे ही गोष्ट महत्त्वाची म्हणावयास हवी. सेन म्हणतात, 'There is something deeply debilitating about denying choice when choice exists, for it is an abdication of responsibility to consider and assess how one should think and what one should identify with.'

या नव्याने प्रसृत केल्या जाणाऱ्या 'विशुद्ध' 'मूळ' अस्मितांच्या मदतीने राजकीय उद्दिष्टे साध्य केली जाऊ शकतात, पण यांच्या प्रभाव व प्रसारामधून हुकुमशाहीच्या प्रस्थापनेला पोषक वातावरण निर्मिती होऊन त्या दिशेने पाऊल पुढे पडू शकते. याचा अनुभव आपण भारतात विहिंप शिवसेना यांच्याद्वारा प्रसृत केल्या जाणाऱ्या हिंदू अस्मितेच्या संदर्भात घेत आहोत. तशीच प्रक्रिया स्वतःला इस्लामिक घोषित केलेल्या राष्ट्रांमध्ये पण घडत असल्याचे विख्यात कादंबरीकार नायपॉल यांनी नमूद केले आहे. ("The newly asserted identities.... can also tyranaize by eliminating the claims of other identities that we may also have reason to accept and respect.")

अस्मितेला अनेक पदर असतात, ती अनेकविध असते, अस्मितेच्या संदर्भात चिकित्सा व निवड यांना एक महत्त्व असते ही गोष्ट नाकारण्यातून दमनाला वाट मोकळी सापडू शकते — दमन नव्या तसेच जुन्या रूपात — आणि हिंसा आणि क्रौर्य यांना जय देऊ शकते, हे सेन यांचे म्हणणे महत्त्वाचे आहे.

एखादे वास्तव कसे दिसेल, एखाद्या निर्णयाचा अर्थ कसा लावला जाईल यावर समुदाय व संस्कृती यांचा मोठा प्रभाव पडतो यात काही शंका नाही. सामाजिक अस्मिता माणसांची 'दृष्टी' घडविते. (perceptual function of social identity).

आता, सेन असा मुद्दा करतात की, एक ना एक दृष्टी वा भूमिका (म्हणजे अस्मिता) असल्याखेरीज आपण विवेकाचे उपयोजन करू शकत नाही. (One cannot reason from nowhere). कारण आपली अस्मिता काय आहे. त्यावर आपण विवेक कसा करतो हे अवलंबून असते. पण सेन पुढे असे म्हणतात की, याचा अर्थ दृष्टी व भूमिका (encum-

bered position) असली की, सारासारविवेक करून निवड करता येत नाही. दृष्टी व भूमिका कोणतीही असो चिकित्सक कसोट्यांवर परीक्षा करता येतेच, योग्यायोग्य निवड करताच येतेच. ('choice does not require jumping out of nowhere into somewhere.')

आता, आपली गृहीतके, आपले ज्ञान, आपल्या वृत्ती, संयुक्तिक युक्तिवाद कोणता म्हणता येतो याविषयीची आपली मते यांचा आपण कसा विवेक करतो यांवर परिणाम होतो हे निश्चित, पण एक विवक्षित अस्मिता अंगिकारून एका विशिष्ट सांस्कृतिक परंपरेच्या चौकटीतच आपण विवेक करू शकतो असे म्हणणे बरोबर ठरत नाही असे सेन यांचे म्हणणे. ते म्हणतात, 'Influence is not the same thing as complete determination.'

आणखी असे की, कोणतीही संस्कृती घेतली, तरी ती पूर्णतया वृत्ती व समजुती यांचा एक एकमेवाद्वितीय संच (uniquely defined set of attitudes and beliefs) असत नाही. तीत मतमतांतरे असतात. उदाहरणार्थ, सेन म्हणतात, भारतीय परंपरा धर्मनिष्ठ आहे हे तिचे व्यवच्छेदक वैशिष्ट्य मानले जाते; पण नास्तिक व अज्ञेयवादी दर्शनांची मांडणी करणारे जेवढे विस्तृत साहित्य संस्कृत आणि पाली भाषांमध्ये आहे तेवढे कदाचित ग्रीक, रोमन, अरबी व हिब्रू या प्राचीन अभिजात भाषांपैकी कोणत्याही एका भाषेत नसेल. पण अलीकडे आफ्रिकी व आशियाई संस्कृतींच्या संदर्भात, आपल्या देशाशी, समाजाशी व संस्कृतीशी एकनिष्ठ राहावयाचे असेल तर सार्विक (universal) विवेकाच्या आधारे चिकित्सा न करण्याचा आग्रह राखला जातो. अशी चिकित्सा केल्यास सच्चेपणा व अस्सलपणा यांना बाधा पोचते असे मानले जाते याकडे सेन लक्ष वेधतात. पाश्चात्त्य आक्रमणाविरुद्ध शौर्याने दंड ठोकून राहणारे वीर म्हणून स्वतःच्या देशी संस्कृतीच्या लक्ष्मणरेषेची मर्यादा मानणाऱ्यांचा गौरव केला जातो.

पण या प्रकारे गौरव करण्यात एक गोची आहे. लक्ष्मणरेषा ओलांडता येत असूनही विचारपूर्वक ती न ओलांडण्याची भूमिका असेल तरच ती भूमिका घेणाऱ्याचा गौरव करणे अर्थपूर्ण ठरते. एरवी, देशी अस्मितेची जपणूक केवळ अनिवार्यतेपोटी यांत्रिकपणे केली जाते असे होईल. तेव्हा, ज्यांना आपल्या देशी संस्कृतीचे व पारंपरिक अस्मितेचे रक्षण-संवर्धन करावयाचे असेल त्यांना, आपण विवेकपूर्वक निर्णय करून तसे करीत आहोत असे म्हणता यायला हवे, असा मुद्दा सेन करतात.

भारताच्या वर्तमान परिस्थितीत आशय व आकार यांच्या संबंधात, अस्मितांच्या स्वतःच्या सांस्कृतिक चौकटींच्या मध्ये राहूनही सार्विक विवेकाच्या कसोट्यांवर त्यांची परीक्षा करीत, योग्यायोग्यविवेक, नीरक्षीरविवेक करण्याचे विशेषच महत्त्व आहे. विभिन्न धार्मिक, सांस्कृतिक परंपरा व अस्मिता असणाऱ्या लोकांना एकोप्याने, परस्परांविषयी बंधुभाव, न्यायबुद्धी व समदृष्टी बाळगून एकमेकांसोबत शेजारी म्हणून निरंतर राहावयाचे तर संस्कृती व अस्मिता यांचे विवेकाने सातत्याने परिष्करण करीत राहण्याची गरज स्पष्ट आहे.

आपल्या समुदायनिष्ठ, संस्कृतीनिष्ठ देशी अस्मितांचे महत्त्व त्यांच्या त्यांच्या ठायी महत्त्वाचे आहेच. पण त्याच वेळी या अनेकानेक देशी अस्मितांच्या पलीकडे आपण सर्व माणसे आहेत, आणि हे नाते आपणामध्ये भेद उत्पन्न करणाऱ्या नाना अस्मितांना छेद देऊन पलीकडे पोचणारे आहे, याकडे सेन यांनी लक्ष वेधले आहे.

आपल्या विवेचनाच्या शेवटी अमर्त्य सेन राष्ट्र-राज्य आणि नागरिकत्व यांच्या पलीकडे पोचणाऱ्या देशोदेशींच्या लोकांच्या परस्परसंबंधांची गोष्ट करतात. अमूक देशाचा रहिवासी व नागरिक या नात्यानेच आपला प्रत्येक वेळी इतरांशी संबंध येतो असे नाही. आपल्या अनेक भूमिका व त्या भूमिकांशी जोडलेल्या अस्मिता यांच्यामुळे आपण देशोदेशींच्या व्यक्तींशी जोडलेले असतो. उदाहरणार्थ, आपण एखाद्या ज्ञानशाखेतील वैज्ञानिक वा अभ्यासक असलो तर, किंवा साहित्यिक/कलावंत असलो तर, त्या नात्याने आपण जगभरच्या त्याच कोटीतल्या व्यक्तींशी जोडलेले असतो. ही जी आपली नाती असतात त्यांच्यासाठी आपले विवक्षित राष्ट्रीयत्व वा त्याआधारे प्राप्त होणारे नागरिकत्व यांच्यावर आपण विसंबलेले नसतो. किंबहुना, काही प्रसंगी आपले वैज्ञानिक, अभ्यासक, साहित्यिक, कलावंत या भूमिकांमधून जोडली जाणारी नाती ही राष्ट्र-राज्याच्या भूमिका व धोरणे यांच्या धोरणांच्या, पवित्र्यांच्या विरोधात जाऊ शकतात. ही गोष्ट ज्या नात्याने आपण जगातल्या सर्व माणसांशी जोडलेले असतो त्या नात्याच्या संदर्भात खरी असते. थोडक्यात, आपले राष्ट्रीयत्व व नागरिकत्व, समुदायाचे सभासदत्व आपल्याला संकुचित व साचेबंद बनवीत असते तर काही भूमिका/अस्मिता, व त्यांच्यामधून उत्पन्न होणाऱ्या

आस्था, जबावदाऱ्या आणि कर्तव्ये आपणास वैश्विक बनवीत असतात. ('then imperatives that we may associate with our shared humanity may not be mediated by our membership of collectivities such as 'nations' or 'peoples.')

माणसे — म्हणजेच व्यक्ती — या नात्याने आपले इतरांशी जे व्यवहार चालतात, जे संबंध जोडले जातात त्यांचे मापदंड (norms) आणि नियम राष्ट्र-राज्यांच्या संबंधांच्या चौकटीत ठरत नाहीत. बाजारपेठेत जी देवाणघेवाण चालते तिच्या संदर्भात तर ही गोष्ट अधिकच खरी आहे. या व्यवहारांची आधारभूत आचारसंहिता आणि रीतीभाती, संकेत, शिस्त यांची चौकट अगदी वेगळी असते. त्यांचे स्रोत वेगळे असतात.

याचाच अर्थ असा की, समुदाय, राष्ट्र, वंश, लोक यांच्या चौकटीत व्यक्तींना प्राप्त होणारी/होणाऱ्या अस्मिता याच एकमेव नसतात. आपल्या सगळ्याच अस्मिता आपल्याला समुदायांकडून प्राप्त होत नाहीत. व्यक्ती या नात्याने त्या आपण स्वतः स्वतःला प्रदान करीत असतो. अशा अनेकविध अस्मितांमधून जी अनेकविध कर्तव्ये, जबाबदाऱ्या, अधिकार-हक्क, बांधिलक्या उत्पन्न होतात. त्यांच्यामध्ये नेहमीच मेळ नसतो; विरोध व ताण असतो, यांची सोडवणूक करून सुसंवाद व संतुलन प्रस्थापित करणे गरजेचे असते. ही गोष्ट केवळ योग्य-अयोग्य विवेक करण्यामधूनच साध्य होऊ शकते.

योग्य-अयोग्य विवेक, अर्थातच, मूल्ये, ध्येये व जीवनाची साध्ये यांच्या आलोकामध्ये करावयाचा असतो. व्यक्तिस्वातंत्र्य, न्याय, समता, सर्वांचे भले, माणुसकी/शेजारधर्म ही मूल्ये सेन गृहीत धरतात. आणि ते योग्यच आहे. जॉन रॉल्स यांनी लिबरल भूमिकेमधून न्यायविचार मांडला आहे त्याची कास न सोडण्याची गोष्ट सेन करतात. या संदर्भात ते शेवटी एक महत्त्वाचा मुद्दा मांडतात. तो असा की, एकेका समुदायाची व संस्कृतीची ज्ञानमीमांसा वेगळी व वैशिष्ट्यपूर्ण असते, त्या त्या समुदायाची व संस्कृतीची नीतीमूल्ये अशीच वेगळी व वैशिष्ट्यपूर्ण असतात, आणि ती सर्वच सारखीच वैध व प्रमाण असतात, ही भूमिका ते अव्हेरतात. विभिन्न संस्कृती या ज्ञान व नीती या दृष्टीने परस्परांशी कोणतीच देवाणघेवाण होऊ न शकणारी बेटे नसतात. ('....we have resons to be suspicious of separatism in epistemology and ethics proposed by strong forms of communitarianism and the related tendency to treat different cultures as cognitive and moral islands.')

जात-जमातीय, धार्मिक, वांशिक-सांस्कृतिक अस्मितांना कट्टर, परस्पर व्यावर्तक रूप देऊन त्यांच्या आधारे आक्रमकपणे समाजकारण-राजकारण करण्याचा पायंडा आज भारतात रुजला आहे. या सगळ्यात विवेकाला फाटा दिला जात आहे. याचे भीषण घातक परिणाम होताना अनुभवाला येत असले तरी प्रत्येक राजकीय समूह (पक्ष, संघटना इत्यादी) आत्मगौरवपूर्ण, भूमिकेमधून, 'स्वतःचे म्हणणेच खरे' असे आग्रह-पूर्वक इतरांवर लादू पहात आहे. या पार्श्वभूमीवर अमर्त्य सेन यांच्या विवेचनापासून आपण सर्वांनीच बोध घेणे महत्त्वाचे आहे.

⌘⌘









अनुक्रमणिका

# १९४२ चे 'चले जाव' आंदोलन : काही प्रश्न

**विश्वास दांडेकर**

इ.स. २००२ च्या ऑगस्ट महिन्यांत १९४२ च्या चळवळीला साठ वर्षे पूरी होत आहेत. या चळवळीच्या संदर्भात 'छोडो भारत', 'करा वा मरा', 'ऑगस्ट क्रांती' अशा अनेक घोषणा जनमानसाच्या स्मृतीत आहेत. सालाबादप्रमाणे याही वर्षी ९ ऑगस्टच्या स्मृतींना उजाळा मिळेलच. पण १९४२च्या आंदोलनाचा हा साठावा स्मृतिदिवस असल्याच्या निमित्ताने त्यांविषयीच्या नुसत्या रोमांचक आठवणी न जागवता काही कोड्यात टाकणाऱ्या प्रश्नांची उत्तरे सापडतात का हेही पाहिले जावे असे वाटते. आंदोलनातले पहिल्या फळीचे नेते आता काळाच्या पडद्याआड आहेत. त्या काळी वा नंतर नेत्यांच्याजवळ वावरलेली काही मंडळी हयात आहेत. शिवाय पत्रव्यवहार, तत्कालीन शासकीय गुप्त कागदपत्रे अशी साधनेही उपलब्ध आहेत. ६० वर्षांचा काळ लोटल्याने काही प्रमाणात तटस्थतेने घटनांचा अर्थ लावणे कदाचित शक्य होईल.

**जाणवणारे प्रश्न असे :**

१) ३ सप्टेंबर १९३९ रोजी ब्रिटनने जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारले आणि दुसऱ्या महायुद्धाला सुरुवात झाली. ताबडतोब भारताच्या व्हाइसरॉयने भारतही या युद्धांत ब्रिटन-फ्रान्सच्या बाजूने सहभागी होत असल्याची घोषणा केली. युद्धप्रयत्नांत सहभाग नाही म्हणून १९३५ च्या कायद्यान्वये झालेल्या निवडणुकांमधून सत्तास्थानी असलेल्या काँग्रेसपक्षीय मंत्रिमंडळांना त्यागपत्र देण्यास सांगण्यात आले. हा निर्णय कितपत योग्य होता?

२) 'छोडो भारत' चळवळीचे उद्दिष्ट काय? वरवर पाहता ही चळवळ स्वातंत्र्य आंदोलनाच्या नानाविध प्रयत्नांच्या साखळीतला एक भाग म्हणून सहजच जाणवते. तिचा परिणाम स्वातंत्र्याची चळवळ एक पाऊल पुढे नेणे असा झाला हे सहजच मान्य करता येईल. पण हे वरवर दिसणारे चित्र जरा खोलात जाऊन पाहाता इतके सरळ सोपे दिसत नाही. तेव्हां सर्वोच्च नेतृत्वाच्या पातळीवर उद्दिष्ट काय होते असा प्रश्न उद्भवतो.

४२ च्या आंदोलनाला दुसऱ्या महायुद्धाची पार्श्वभूमी आहे. वर उपस्थित केलेल्या दोन्ही प्रश्नाची चर्चा या, जगाचा नकाशा बदलणाऱ्या महायुद्धाच्या संदर्भात तसेच काँग्रेसच्या तत्कालीन धोरणांच्या संदर्भात करणे आवश्यक आहे.

**काँग्रेसची भूमिका**

प्रांतांमध्ये काँग्रेस सत्तेवर होती. तिथले मंत्रिमंडळांचे राजिनामे हा 'निषेध नोंदवणे' या प्रकारातला एक शिष्टसंमत मार्ग. यातून नाराजी व्यक्त करण्यापलीकडे काय साधले? ही नाराजी व्यक्त करण्याचे इतर अनेक मार्ग सहजच सापडले असते. महायुद्धात जर्मनी-इटली या फॅसिस्ट शक्ती आहेत, सबब ब्रिटन-फ्रान्स अशा साम्राज्यवादी शक्तींपेक्षा त्या जास्त धोकादायक आहेत. जर या फॅसिस्ट तत्त्वज्ञानावर आधारलेल्या शक्तींचा विजय झाला तर जग एका अंधारयुगाच्या गर्तेत फेकले जाणार ही विचारधारा काँग्रेसच्या वरिष्ठ नेतृत्वाची होती. ती स्पष्ट व योग्य होती. यातून भारत स्वतंत्र करा, स्वतंत्र भारत पूर्ण ताकदीने फॅसीझम विरुद्धच्या युद्धांत साथ देईल अशी जाहीर मागणी काँग्रेसने केली. शत्रू अडचणीत आहे, शत्रूचा शत्रू तो आमचा मित्र असा सरधोपट तर्क इथे लागू पडत नाही. हा विचारही योग्य होता. महायुद्धांत गुंतलेला ब्रिटन त्या क्षणाला भारताला स्वातंत्र्य देणार नाही. हे समजण्याची क्षमता नेतृत्वाची नक्कीच होती. या दबावाखाली युद्ध संपताच भारत स्वतंत्र होईल असे जाहीर आश्वासन देण्यास ब्रिटनला भाग पाडावे हा उद्देश स्पष्ट दिसतो. या पार्श्वभूमीवर मंत्रिमंडळे सत्तास्थानी कायम राहाणे अधिक फायदेशीर ठरले असते.

१९३९ साली महायुद्धामुळे काय परिणाम होणार, जगाच्या नकाशांत काय बदल होणार हे कुणालाच अंदाजता आले नसते. रशिया, जपान, अमेरिका अजून युद्धांत उतरले नव्हते, उतरतील असा अंदाजही बांधता येत नव्हता. अशा संपूर्ण अनिश्चिततेच्या वातावरणांत सत्तास्थानी आपली काही मंडळी असणे लाभप्रद असते. तसे पाहिले तर ही मंत्रिमंडळे प्रातिनिधिक नव्हतीच. १९३५ च्या कायद्याप्रमाणे प्रत्येक प्रौढ नागरिकास मतदानाचा हक्क नव्हता. भारतभर पसरलेल्या संस्थानांमधल्या प्रजेचे कुठलेच प्रतिनीधित्व यांत नव्हते. मंत्रिमंडळाचे सामुहिक






व वैयक्तिक अधिकारही फार मर्यादित होते. यांचे निर्णय केंद्रशासनात व्हाइसरॉय, तर प्रांतांमध्ये गव्हर्नर बाजूला सारू शकत. शांतीकाळात जर ही अवस्था तर युद्धकाळांत हे अधिकार आणखी मर्यादित होणार हे उघड आहे. त्यामुळे या त्यागपत्रांचे महत्त्व केवळ प्रतिकात्मक आहे. अशा प्रतिकात्मक महत्त्वासाठी मंत्रिमंडळे तशीच राहू देण्यातून मिळणारे काही लाभ आपण गमावले.

जागा-अधिकार कमी महत्त्वाचे असले तरी आपण जर 'आत' असलो तर अनेक प्रकारची माहिती, बातम्या मिळू शकतात. या स्त्रोताचा उपयोग पुढची रणनीती आखण्यासाठी करता येतो. वर म्हटल्याप्रमाणे १९३९ साली चित्र खूप धूसर, अस्पष्ट, अनिश्चित होते. शासनांत अगदी खालच्या स्तरापासून सर्वोच्च पातळीपर्यंत माहितीचे अनेक स्रोत असतात. अशा स्त्रोतांतून मिळणाऱ्या लहान लहान बातम्या अनेकदा चित्र स्पष्ट करण्यास मदत करतात. अशी माहिती गोळा होत राहाणे, त्याचे एकत्रीकरण-विश्लेषण करून पुढच्या पावलाचा अंदाज घेणे या वाटेवरचे एक महत्त्वाचे साधन, प्रतिकात्मक निषेध या कारणासाठी त्यागणे कितपत योग्य ठरते? का या जाणिवेचाच अभाव होता?

ही मंत्रिमंडळे कार्यरत राहाणे ब्रिटिश नोकरशाहीला अडचणीचे ठरणे अपरिहार्य होते. पुढे चालून ती बरखास्त करणे हे पाऊल उचलले गेले असते. महायुद्ध हे लोकशाही व्यवस्था विरुद्ध फॅसिस्ट अशा स्वरूपांत ब्रिटन रंगवत होते. त्यामुळे बरखास्ती झाल्यास, हेच लोकशाही आदर्श का, अशी ओरड करायला काँग्रेस सरकारांना वाव मिळाला असता. तोपर्यंत दुय्यम-तिय्यम फळीतल्या नेत्यांना युद्धकाळांतल्या कारभाराचा काही अनुभवही मिळाला असता. त्यागपत्रांमुळे हे सर्व गमावले.

अर्थात ४२ च्या आंदोलनाच्या संदर्भात मंत्रिमंडळांचे सामुहिक राजीनामे हा तुलनेने कमी महत्त्वाचा प्रश्न आहे. महत्त्वाचा प्रश्न असा की, ऑगस्ट १९४२ मध्ये 'छोडो भारत' अशी घोषणा देत चळवळ सुरू करण्यामागे काय गणित होते?

१९३९ साली असलेले धूसर, अनिश्चित चित्र कांही प्रमाणांत स्पष्ट झाले होते. जपान फॅसिस्टांच्या बाजूने तर रशिया-अमेरिका 'दोस्त' राष्ट्रांच्या बाजूने आता युद्धांत सामील होते. जगव्यापी युद्ध सुरू असताना कच्चा माल-माणूसबळ यांचा प्रचंड पुरवठा करणारा भारत, ब्रिटन सोडणे शक्य नाही ही जाण नेतृत्वाला होती हे स्पष्ट आहे. प्रश्न युद्धोत्तर पावलांची ज़ाहीर हमी असा होता. जिथून ही हमी मिळवायची ती बाजू युद्धात विजयी होणे आवश्यक होते. त्यामुळे त्या प्रयत्नांत अडथळे निर्माण करायचे नाहीत, मात्र मागणीचा दबाव ठेवायचा, ही दिशा १९३९ सप्टेंबरपासून पाळण्यांत आली. मग ४२ च्या ऑगस्टमध्ये परिस्थितीत असे काय मोठे बदल जाणवले ज्यामुळे 'छोडो भारत' पुकारावा लागला?

काँग्रेसच्या सर्व वाटचालीत - स्वातंत्र्योत्तरही बराच काळ - सर्व आंदोलने - प्रश्नांना भिडणे यात एक समान सूत्र दिसते. आपली ताकद किती यांचा नीट अंदाज घेणे, त्यावर आंदोलन बेतणे, त्यातून शक्ती वाढवणे, एका टप्प्यावर पोचणे आणि तिथे पुन्हा जमवाजमवीसाठी उसंत घेणे असे हे सूत्र दिसते. साहजिकच आंदोलनातले कार्यक्रम, त्याची व्याप्ती, कुठल्या टप्प्यापर्यंत जायचे आहे – जाणे शक्य आहे याचा नीट अंदाज बांधणे, तिथे पोचल्यावर तडजोड, अशी नीट पूर्वतयारी करूनच आंदोलन छेडले जात असे, स्थगित केले जात असे. नेतृत्वाच्या सर्व फळ्यांमध्ये ही जाण पाझरत असल्यामुळे काँग्रेसची खरी ताकद तडजोडीचा टप्पा कुठला, हा अंदाज आधी नीट बांधून मग प्रश्नांना हात घालण्यात होती. गोखले-टिळक-गांधी या प्रवासात हा धागा सारख्याच प्राबल्याचा जाणवतो. स्वातंत्र्योत्तर नेहरू युगातही हा जपला गेला. पुढे हे भान सुटले आणि पक्ष म्हणून ऱ्हासाला सुरुवात झाली. या प्रवासांत 'ऑगस्ट १९४२' हा मात्र ठळक अपवाद दिसतो. याचे जाहीर उद्दिष्ट 'भारत छोडो', कार्यक्रम 'जमेल ते करा-वा-मरा', तडजोडीचा टप्पा ठरलेला नाही; असे अनियंत्रित, निर्नायकी आंदोलन पुकारण्याचा हेतू काय?

हे आंदोलन तसे तोडफोड-हिंसकही होते. महात्मा गांधींसाठी अहिंसा हा जीवननिष्ठेचा भाग होता. सरदार, नेहेरू, आणखीही वरिष्ठ, मध्यम पातळीवरच्या नेत्यांची ही जीवननिष्ठा नव्हती, पण सशस्त्र मार्ग अव्यवहार्य म्हणून अहिंसक चळवळ मान्य होती. युद्ध प्रयत्नांना सहकार्य नाही पण अडथळे निर्माण करायचे नाहीत हा व्यवहार बाजूला सारणारे, निष्ठा वा आवश्यकता म्हणून स्वीकारलेला अहिंसक मार्ग उधळून देणारे, पूर्वनियोजित कार्यक्रम नसलेले, तडजोडीचा टप्पा नियंत्रणात नसणारे असे आंदोलन जाहीर करणे हे का करावे लागले? आंदोलन संपवण्याला ब्रिटिश सत्तेला काही आठवडे पुरले.

अनुक्रमणिका

एक स्पष्टीकरण संभवते ते जपानच्या संदर्भात. १९व्या शतकाच्या उत्तरार्धापासून जपान नव्या वाटेवर होता. पहिल्या महायुद्धात जपान एक बलवान सागरी शक्ती म्हणून इंग्लंड-फ्रान्सच्या बाजूने युद्धांत होता. आशियातल्या या उगवत्या राष्ट्राला साम्राज्यतृष्णा होती. इतिहासाचार्य राजवाड्यांसारख्या काळाचा जबडा उघडून पाहणाऱ्या प्रज्ञावंताने पाहिले महायुद्ध सुरू होण्यापूर्वीच पुढचे चित्र पाहिले होते. साम्राज्यनिर्मितीसाठी 'मोकळी' भूमी आता उपलब्ध नव्हती. तेव्हा अतिपूर्वेकडील ब्रिटिश-फ्रेन्च-डच साम्राज्याचे लचके तोडणे, चीनच्या अंतर्गत यादवीचा फायदा घेत जपानी भूमीशी संलग्नता सागरी मार्गाने ठेवता येणाऱ्या भूमींवर आपले साम्राज्य उभारणे, हे करत असताना रशिया तटस्थ ठेवणे हाच एकमेव मार्ग जपानला उपलब्ध होता. निमित्त अमेरिकेशी होणाऱ्या पॅसिफिक महासागराच्या वर्चस्वासाठीच्या कटकटींचे, पण प्रधान युद्धहेतू साम्राज्यनिर्मिती. अशा वातावरणांत युरोप युद्धांत गुंतलेला पाहून ७ डिसेंबर १९४१ रोजी जपान युद्धांत उतरला. अमेरिका-ब्रिटन जपानचे शत्रू झाले. अमेरिका युद्धात ओढली गेली.

जपानचे युद्धात उतरणे हा एक 'प्रचंड धडक' अशा स्वरूपात जाणवलेला हादरा होता. युरोपमधल्या युद्धांत ब्रिटनने स्वतःचे व साम्राज्याचे सर्वस्वपणाला लावले होते. जर्मनीने २२.६.४१ रोजी रशिया आघाडी उघडली. फ्रान्स पराभूत झाला होता. अशा परिस्थितीत पूर्वेकडच्या साम्राज्यासाठी फार मोठे सामर्थ्य गुंतवून ठेवणे ब्रिटनला शक्य नव्हते. साहजिकच जपानच्या धडकेत सिंगापूर ते ब्रह्मदेश (आताचा म्यानमार) असा अतिपूर्वेचा ब्रिटन-फ्रान्स-डच साम्राज्याचा बराच मोठा भाग जपानी टाचेखाली गेला. ब्रिटनने माघार घेत स्थानिक जनतेला जपानच्या मर्जीवर सोडले. ऑगस्ट १९४५ मध्ये अमेरिकेने जपानच्या नागरी वस्तीवर दोन अणुबाँब टाकले. या कृत्याचा अमानुष (निषेध) म्हणून आजही दरवर्षी निषेध केला जातो. मात्र दुसऱ्या महायुद्धाआधी चीनमध्ये, आणि महायुद्धाच्या पहिल्या ६-८ महिन्यांत जिंकलेल्या प्रदेशांत, जपानने कशा पद्धतीची अमानुष वाटचाल केली त्याचा उच्चार करण्याची परंपरा नाही. यापुढे जपानचे उद्दिष्ट भारत जिंकणे हे असेल. ब्रिटनला पूर्वीसारखीच माघार घेणे भाग पडेल, भारत जपानी वरवंट्याखाली चिरडला जाईल असा निष्कर्ष काँग्रेसच्या वरिष्ठ नेतृत्वाने काढला. या परिस्थितीत जपानला जमेल तसा, जमेल तिथे प्रतिकार जनतेने करावा, त्यासाठी त्यांचे मनोबल बांधणे, उंचावणे, वाढवणे आवश्यक होते. 'छोडो भारत' चळवळीचे हे उद्दिष्ट होते, असे विश्लेषण मांडण्यात आले आहे. हे समजून घेण्यांत — पटवून घेण्यांत अडचणी आहेत.

प्रमुख अडचण आहे ती जाहीर वक्तव्यांची. 'छोडो भारत' चळवळीच्या घोषणा गोवालिया टँक मैदानावर झाल्या. (आता ऑगस्ट क्रांती मैदान) हे काँग्रेस महासमितीचे अधिवेशन होते. देशभरातले नेते-अनुयायी तिथे जमले होते. जपानच्या संभाव्य भारत व्यापण्याच्या, वेळ आली तर जपानच्या दयेवर भारतीय प्रजेला ठेऊन पळ काढण्याच्या परिस्थितीतील एक राष्ट्र म्हणून तोंड देण्याच्या तयारीचा भाग म्हणून हे आंदोलन आहे अशी काही मांडणी गांधीजी, नेहरु, सरदार, मौलाना यांच्या भाषणांत आढळत नाही. सर्व मांडणी ब्रिटिशांनो भारत सोडा, राज्य आमच्या स्वाधीन करा अशी आहे. आंदोलन छेडण्याचा धोरणात्मक निर्णय जून ४२ चा, त्याआधी विचारांची देवाण-घेवाण झाली असणार. जून ते ऑगस्ट या काळांत हा विचार देशभर पसरवण्यासाठी सभा, प्रचार, लिखाण अशी मोहीम आखलेलीही जाणवत नाही, राबवणे हा पुढचा भाग. दोन महिन्यांचा काळ कमी पडला असता तर अधिवेशनाची तारीख पुढे ढकलणे सहज शक्य होते.

### निराधार गृहितके

खरे तर जपानने भारत जिंकण्याचा प्रयत्न करणे आणि त्या रेट्याखाली ब्रिटनने व्यवस्था निर्नायकी अवस्थेत सोडून पलायन करणे ही तथाकथित गृहितके त्याकाळी बांधायला आधार काय? ब्रिटन, अमेरिका, रशिया, जर्मनी, इटली, जपान अशा राष्ट्रांच्या सैनिकी तयारीच्या, गुप्त वार्तांच्या, युद्धधोरणांच्या, सर्वोच्च पातळीवरील विश्लेषणाच्या कुठल्याच गोष्टी काँग्रेसच्या वरिष्ठ नेतृत्वाला कळणे शक्य नव्हते हे आवर्जून नोंदवणे खरे तर आवश्यक नाही. कदाचित यातले काही तुरळक धागे हाती आलेही असते, पण मंत्रिमंडळांच्या सामूहिक त्यागपत्रांमुळे तो स्त्रोत गमावलेला होता. अशा परिस्थितीत देशी-परदेशी वृत्तपत्रांतल्या बातम्या, परदेशांतल्या युद्धपूर्व परिस्थितीची जाण या आधारावरच विश्लेषण-अंदाज शक्य होता. महायुद्ध होणार हा अंदाज निदान १९३७ पासून वरिष्ठ नेतृत्वाला आला होता. त्यामुळे माहितीचे संकलन, वर्गवारी, विश्लेषण करणारी एक यंत्रणा उभी करण्याला पुरेसा अवधीही होता.








अनुक्रमणिका

असा काही उपक्रम काँग्रेसच्या वरिष्ठ नेतृत्वाने राबवल्याचे दिसत नाही. जर अशी काही व्यवस्था राबवली असती तर जपान भारतावर आक्रमण करेल, त्या रेट्यापुढे ब्रिटन भारत सोडेल हे गृहितकच चुकीचे असल्याचे स्पष्ट झाले असते.

दूरवर्ती धोरण पाहिले तर, आपल्या साम्राज्याचा कणा भारत आहे, हे सूत्र १८५७ नंतर ब्रिटनने आचरले आहे. १९व्या शतकांत आणि २० व्या शतकाच्या काही भागांत रशियाच्या विस्तारवादाची दखल घेत ब्रिटनची पाऊले पडत. यासाठी अफगाणिस्तान-मध्य आशिया इथे आपले वर्चस्व ठेवण्याचा सतत प्रयत्न केला जाई. उत्तरेला चीनने चंचू प्रवेश करु नये म्हणून तिबेट मध्ये हस्तक्षेप केला जाई. जपानच्या कारखानदारीची, वाढत्या नाविक सामर्थ्याची पुरेशी जाण ब्रिटनला असणे स्वाभाविक होते. सिंगापूर ते ब्रह्मदेश ही फळी त्यासाठी उपयोगी होती. भारतात फार मोठे खडे सैन्य ब्रिटनने कधीही ठेवले वा उभारले नाही. (ब्रिटिश भारतीय सैन्य धरून) आक्रमण झालेच तर भारताच्या सीमेबाहेर ते अंगावर घ्यायचे, बचाव करत मागे यायचे, मधला काळ साम्राज्याच्या इतर भागातून सैन्य भारतात आणायचे असे ब्रिटने दूरगामी धोरण सतत होते. याचा तपशिल ज्ञात करुन घेणे शक्य असेल/नसेल पण धोरण स्पष्ट व उघड होते. ब्रिटनची अतिपूर्वेतली माघार ही वरील धोरणाप्रमाणे होती. भारत सोडून देणे हा भाग त्यात असण्याचा संभव नव्हता. 'स्ट्रॅटेजिक डेप्थ' या संकल्पनेचा वापर इथे आहे. हा धोरणव्युह लक्षात घेण्यासाठी कुठल्याही गुप्त कागदपत्रांची गरज नव्हती. 'जिओस्ट्रॅटेजी' म्हणजे भूगोलाच्या आधारे व्युहरचना यात हे धोरण मोडते.

ऑगस्ट ४२ च्या सुरुवातीला महायुद्ध कुठल्या टप्प्यावर होते? इथेही फक्त वर्तमानपत्री बातम्या पुरेशा आहेत. २२ जून १९४१ रोजी जर्मनीने रशियावर हल्ला केला. पहिले काही महिने जर्मनीची सरशी होत जर्मनी मास्कोच्या जवळपास पोचली. मात्र इथून जर्मनीची पिछेहाट सुरु झाली. मध्यपूर्वेत सुवेझ कालवा ओलांडण्यात जर्मन सेनापती रोमेलला अपयश आले. स्टॅलिनग्राडची व अल अलामिनची लढाई या घटना नंतरच्या; पण रशियात पाऊल मागे घेणे - मध्यपूर्वेत थांबावे लागणे हे स्पष्ट झाले होते.

जपानचे चित्र निराळे नाही. ७ डिसेंबर ४१ च्या पर्ल हार्बर हल्यानंतर जपानने झपाट्याने म्यानमारपर्यंत धडक मारली. यापुढे भारतावर हल्ला दोनच मार्गांनी शक्य होता. एक : ब्रह्मदेशातुन. ब्रिटनच्या भारतासाठीच्या संरक्षण व्यवस्थेचा एक महत्त्वाचा दुवा म्हणजे आसामच्या दिमापूरपर्यंत रेल्वे नेणे. त्यामुळे सैन्य हालचाल, रसद पुरवठा तुलनेने सोपा होता. भारत-ब्रह्मदेश हे दोन्ही आपल्या साम्राज्याचा भाग असूनही ब्रिटिश सत्तेने कधीही रेल्वे वा रस्ता मार्गाने भारत ब्रह्मदेशाशी जोडला नाही. नौदलाच्या शक्तीवर विसंबून राहाणेच त्यांनी पसंत केले. ब्रह्मदेशांतून भारतात चढाई करायची तर पाठीशी भारताच्या सीमेपर्यंत रेल्वे-रस्ता-जाळे ही किमान आवश्यकता होती. ते अस्तित्वात नसल्याने दुसरा मार्ग हा सागरी होता. ब्रह्मदेश ताब्यांत असल्याने त्या देशाच्या पश्चिमी तटावरून सागरी मार्गाने सैन्य-शस्त्रास्त्रे भारताच्या ओरिसा, आंध्र, तामिळनाडू यापैकी कुठेतरी उतरवत युद्धविस्तार करायचा. इथे फक्त बंगालचा उपसागर ओलांडणे पुरेसे नव्हते. आधुनिक सैन्याला अशा लढाईत तोफा-रणगाडे-दारुगोळा-रसद असा प्रचंड पुरवठा आवश्यक असतो, तो अविरत असावा लागतो. यात इंधन म्हणून खनिज तेल हा घटक महत्त्वाचा. असा तळ प्रथम ब्रह्मदेशांत उभारुन तिथे साठा करणे. त्यात सतत भर घालणे यासाठी प्रशांत, चिनी व हिंदी महासागरावर (त्यात बंगालचा उपसागर गृहीत आहे.) निखळ प्रभुत्व आवश्यक होते. पर्ल हार्बर व सिंगापूर या विजयांनंतरही हे प्रभुत्व जपानकडे नव्हते. याला दोन कारणे आहेत.

पर्ल हार्बर - सिंगापूर या दोन्ही ठिकाणची अमेरिकन व ब्रिटिश नौदलाची हानी ही 'बॅटलशिप' या प्रकारातली. हे दोन्ही हल्ले जपानने यशस्वी केले ते विमानवाहू नौकांच्या सामर्थ्यावर. रणगाडे व विमाने यांचा फार तुरळक उपयोग पहिल्या महायुद्धावर प्रभाव टाकू शकली नाहीत. १९३९-४० मध्ये जर्मनीने विमान-रणगाडा यांचा एकत्रित उपयोग करत, पोलंड-फ्रान्स मध्ये जगाला आश्चर्यचकित करत भूमीवरील युद्धाचे स्वरूपच पालटून टाकले. पर्ल हार्बर - सिंगापूर येथे जपानने विमानवाहू नौकांच्या साह्याने सागरी युद्धाचे स्वरूप आमूलाग्र बदलले. मात्र पोलंड-फ्रान्स मधला जर्मनीचा व पर्ल हार्बर-सिंगापूर इथला जपानचा प्रयोग यशस्वी झाला तो अनपेक्षित धक्कातंत्रामुळे शस्त्र-अस्त्र नवे नव्हते, त्याचा वापर करण्याची रीत नवी होती. एकदा वापरली गेल्यावर नाविन्य संपले. एका बाजूला नवी रीत आत्मसात करत दुसऱ्या बाजूला प्रयोग उलटवणाऱ्या रीती शोधल्या गेल्या. साहजिकच पुन्हा

पर्ल हार्बर शक्य नव्हते. सिंगापूर पडले तरी श्रीलंका ब्रिटनच्या ताब्यांत होती. तिथला त्रिकोमालीचा नाविक तळ हिंदी महासागर-बंगालचा उपसागर-अरबी समुद्र यांचेवर प्रभुत्व ठेवण्यास उपयोगी ठरला. दुसरे म्हणजे पर्ल हार्वरला अमेरिकन नौदलाच्या ज्या महाकाय रणनौका नष्ट झाल्या त्या सर्व बॅटलशिप प्रकारातल्या. प्रशांत महासागरातले अमेरिकेचे विमानवाहू नौदल पर्ल हार्बरला नसल्याने संपूर्णपणे सुरक्षित राहिले. (हा जपानच्या गुप्तहेर खात्याचा पराजय मानला जातो.) या अमेरिकन विमानवाहू नौदलाने जून १९४२ मध्ये जपानच्या विमानवाहू नौदलाचे कंबरडे मोडले. 'लिटी गल्फ' चे सागरी युद्ध म्हणून ही लढाई विख्यात आहे. इथून जपानच्या पिछेहाटीला सुरुवात झाली.

वरील चित्र, तपशील वगळता त्यावेळी प्रसिद्ध होणाऱ्या देशी-परदेशी वर्तमानपत्रांतून येणाऱ्या बातम्यांमधून रेखाटणे १९४२ च्या मध्याला शक्य होते. त्यासाठी ही वर्तमानपत्रे-पाक्षिके पाहाणे, वर्गवारी, विश्लेषण अशी एक लहानशी यंत्रणा आवश्यक होती. यावरून ऑगस्ट ४२ साली जपानचा फारसा धोका आता भारताला नाही हे लक्षात येणे शक्य होते. भारत सोडून जा, राज्य आमच्या स्वाधीन करा असा दावा करणाऱ्या भारतव्यापी संघटनेला अशी कांही यंत्रणा उभारण्याची आवश्यकता जाणवलेली दिसत नाही. अशा उपक्रमात गांधीजींना रस नसणे स्वाभाविक आहे. इतर अखिल भारतीय नेतेही तितकेच गाफील राहिलेले दिसतात.

या काँग्रेसच्या अखिल भारतीय नेतृत्वाच्या पहिल्या फळीतल्या नेत्यांत जागतिक इतिहास प्रवाहांची सखोल जाण फक्त पंडित नेहेरूंकडे होती. त्यामुळे काँग्रेसच्या धोरणात्मक हालचालींत परराष्ट्र संबंध हा धागा मोठ्या प्रमाणांत आणण्याचे श्रेयही त्यांचेकडेच जाते. ब्रिटन-युरोपमध्ये भरपूर वास्तव्य, ब्रिटनच्या वरिष्ठ वर्तुळांत काही अंशी वावर अशी विस्तृत पार्श्वभूमी त्यांच्या व्यक्तित्वाला होती. साहजिक परराष्ट्र संबंधांवर निरनिराळ्या अंगाने ते विचार करु शकत. यातून स्वतंत्र भारताचे एक निराळे परराष्ट्रधोरण ते आखू शकले. मात्र परराष्ट्रधोरणाचा एक अत्यावश्यक भाग म्हणजे संरक्षणधोरण असते या जाणिवेचा मोठा अभाव नेहेरूंच्या व्यक्तिमत्वात जाणवतो. साहजिकच सैन्यदले, शस्त्र प्रणाली, युद्धतंत्र, त्यावर भूव्युहात्मक आडाखे बांधणे हा भाग त्यांच्या मनोव्यापारांत दिसत नाही. इतकेच नव्हे तर 'सैन्य दले' या बद्दल त्यांच्या मनांत प्रचंड पूर्वग्रह तुच्छता होती. हे पूर्वग्रह-तुच्छता कदाचित तत्कालीन ब्रिटिश वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांच्या सरंजामी वागणुकीमुळे असेल. मात्र ही मनोवृत्ती स्वातंत्र्यानंतरही सुरू राहिली. १५ ऑगस्ट १९४७ नंतर काही काळ भारताचे सरसेनापती असलेल्या जनरल सर रॉवर्ट लॉकहर्स्ट यांनी स्वतंत्र भारताला धोका कुठून कुठून संभवतो, त्यासाठी सैन्यदलांत काय काय करायला हवे यावर विचारप्रक्रिया सुरू करण्यासाठी एक टिपण-डिफेन्स प्लॅन - नेहेरूंकडे पाठवला. नेहेरूंचे त्या टिपणाला अहिंसावादी आहोत. आम्हाला कुठूनही धोका नाही. पोलीस पुरेसे आहेत. सैन्य मोडीत काढायला हवे" या मनोवृत्तीमुळे १९४७ ते १९५७ या काळांत भारताने परराष्ट्रधोरणांत उचललेली बरीच पावले. व्यूहरचनेच्या दृष्टीने योग्य असूनही मांडली मात्र गेली नैतिक संदर्भात परराष्ट्र धोरण आणि संरक्षण धोरण या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत हे लक्षांत न घेतल्याचे परिणाम १९४७ साली काश्मिर, १९५९ व १९६२ साली चीन, अशा प्रसंगी चटका देणारे ठरले. हे चटके आजही भारत सोसतोच आहे. १९३० च्या लाहोर काँग्रेसच्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावापासून स्वतंत्र भारताचा पहिला पंतप्रधान म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जाणत्या नेत्याची ही अवस्था, मग दुसरे काय होणार?

साहजिकच युद्धाचे पारडे आता 'दोस्त' राष्ट्रांच्या बाजूने झुकले आहे याचा अंदाज नेतृत्वाला ऑगस्ट ४२ ला आला नाही. खरे तर यानेही फारसे बिघडले नव्हते. १९३९ साली चित्र स्पष्ट नव्हते, मात्र १९४२ साली संपूर्ण चित्र स्पष्ट होते. जर्मनी-इटली-जपान विरुद्ध ब्रिटन-फ्रान्स- रशिया-अमेरिका अशा युद्धांत मनुष्यबळ, इंधन, कच्च्या मालाचा पुरवठा शस्त्रास्त्र निर्मिती, उत्पादन, अन्नधान्य, भूव्यूहात्मक खोली ... यापैकी कुठलाही निकष लावला तरी 'दोस्त' आघाडी प्रचंड प्रमाणांत वरचढ होती. जून ४१ ला रशिया आणि डिसेंबर ४१ ला अमेरिका युद्धांत पडल्यावर हे युद्ध 'कोण' जिंकणार हा प्रश्न संभवत नव्हता, 'कधी' इतकाच भाग खरे तर विचारणीय होता. तेव्हा 'जपान' हे कुठल्याही पुराव्यावर ४२च्या संदर्भात टिकत नाही.

आता यंत्रणा न उभारल्याने, तसा विचारच न केल्याने 'जपान' हा घटक प्रभावी ठरला असणे शक्य आहे. चुकीचा का होईना, एक अंदाज केला गेला. त्या अंदाजावर आधारुन चळवळ करण्याचे ठरले. मग चळवळीचे उद्देश, हाताळण्याचे मार्ग, वाटचालीची दिशा याबद्दल देशभर प्रबोधन आधी करणे








आवश्यक होते. जपान येणे याची पूर्वअट त्यांनी ब्रिटिशांना हुसकावणे ही आहे. तेव्हां युद्ध प्रयत्नांत अडथळा न आणता हे करण्याचा प्रयत्न करणे शक्य होते. असा कुठलाच प्रयत्न देशभराच्या पातळीवर हाती घेतला गेल्याचे जाणवत नाही. मग 'छोडो भारत' कशासाठी?

**पिढीबदल**

काँग्रेस पक्षाच्या अंतर्गत घडामोडींमध्ये कदाचित '४२' कशासाठी याचे उत्तर दडलेले असू शकेल.

काँग्रेसची स्थापना झाल्यानंतर सुरुवातीची अनेक वर्षे ही संस्था वार्षिक अधिवेशने, ठराव, शिष्टमंडळे, अर्ध विनंत्या अशा परिघात वावरली. हे घडणे स्वाभाविक तसेच परिस्थितीनुकूल होते. विसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काही वर्षांनंतर 'लोकचळवळ' हा भाग येतो. ही टिळकयुगाची सुरुवात म्हणता येईल. अर्धविनंत्यांनी फारसे काही साध्य होत नाही. चळवळीचा रेटा पाहिजे हा विचार पुढे येण्यास पिढीबदल हेही एक कारण आहे. या नव्या प्रवाहाचा दबाव म्हणजे १९०७ चे सुरत काँग्रेस प्रकरण. लोकचळवळी सुरु झाल्या तरी सुरुवातीला त्याचा प्रसार मोठ्या प्रमाणांत शहरी-निमशहरी भागांत असणे स्वाभाविक होते. भाषा कठोर होणे, वर्तमानपत्रांचा प्रभावी उपयोग अशा मार्गाने हा प्रवाह पुढे गेला. पाहिले महायुद्ध (१९१४-१९१८) हे याच काळातले. या युद्धसमाप्ती-नंतर ब्रिटनने भारताला दगा दिला ही भावना प्रबळ झाली. रौलेट कायदा, जालियांवाला बाग हे या टप्प्याच्या अखेरच्या दिवसांतले. गांधीजी १९१४ साली भारतात परतले. पण त्यांचे अखिल भारतीय पातळीवर कार्य १९२० पासूनचे. हा टिळक युगाचा अस्त. इथून चळवळ ग्रामीण भागांत पसरण्यास अधिक वेग आला. इथेही पिढीबदल आहे. १९०७ व १९२० या दोन्ही टप्प्यांवर जुने नेते बाजूला पडत नव्या नेतृत्वाचा उदय-विस्तार झाला. पक्षसंघटना ताब्यांत घेण्याचे नव्या पिढीचे प्रयत्न तर संघटनेचा ताबा स्वतःकडेच राहावा असे प्रस्थापित नेतृत्वाचे प्रयत्न स्पष्टपणे जाणवणारे आहेत.

पहिल्या महायुद्धाच्या शेवटी रशियात साम्यवादी विचार-सरणीवर आधारित सत्तापालट झाला. सर्व जगाच्या इतिहास-भूगोल-वर्तमानाला एक कलाटणी देणारी ही घटना होती. याचे पडसाद भारतात उमटणे स्वाभाविक होते. भारतीय साम्यवादी पक्षाची स्थापना, काँग्रेस अंतर्गत समाजवादी गटाचा उदय-विस्तार हे सर्व १९२० नंतरचे. १९४० हा पुन्हा पिढी-बदलाचा काळ आहे. काँग्रेसमध्ये राहात समाजवादी विचारसरणी जोपासणारा गट या काळांत वाढता राहिला. याचे दडपण संघटनेमध्ये वाढणे स्वाभाविक आहे.

या पार्श्वभूमीवर १९३८ साली सुभाषचंद्र बोस काँग्रेसच्या अध्यक्षपदाच्या निवडणूकीसाठी पुन्हा उभे राहिले. पक्षांतर्गत परंपरा अध्यक्ष एकमताने निवडण्याची. गांधीजींचा शब्द हा अखेरचा-निर्णायक, असा तो काळ. एकमताचे प्रयत्न होऊनही बाजू सुभाषचंद्रांनी आग्रह न सोडल्यामुळे निवडणूक अटळ झाली. प्रस्थापित नेतृत्वाने आंध्रचे पट्टाभी सितारामय्या यांची उमेदवारी जाहीर केली. पट्टाभींचा पराजय हा आपण स्वतःचा वैयक्तिक पराभव मानू, असे गांधीजींनी जाहीर करूनही नेताजी काठावरच्या का होईना बहुमताने निवडून आले. मतदान पाहाता पक्ष उभा दुभंगण्याची शक्यता त्रिपुरा काँग्रेसच्या वेळची आहे. जवळपास १९०७ च्या सुरत काँग्रेस-सारखेच चित्र स्पष्ट आहे की तरुण, समाजवादी गट हा सुभाषांच्या पाठीशी उभा राहिला. नेहेरु-सुभाष हे तरुण नेतृत्व समाजवादी विचारसरणीचे मानले जाई.

बाबू सुभाषचंद्र बोस निवडून आले खरे पण त्यांना काम करणेच शक्य होणार नाही अशी परिस्थिती अधिवेशन काळातच निर्माण झाली. नेहेरु-सुभाष एकत्र आहेत या भावनेने नेताजींना मते मिळाली पण पक्ष उभा दुभंगण्याची वेळ आली हे पाहाता तुटेपर्यंत न ताणण्याची भूमिका नेहेरूंनी घेताच सुभाष अल्पमतात गेले. पक्ष बांधणी, त्यासाठी त्या यंत्रणेवर पकड, या सर्वांसाठी वेळ-श्रम खर्च करणे हा नेहेरुंच्या व्यक्तिमत्वाचा भाग नव्हता. अफाट लोकप्रियतेच्या आधारे पक्षाच्या सीमा ओलांडून ते सरळ जनतेपर्यंत जाऊ शकत हेही एक कारण असावे. जरी त्रिपुरा काँग्रेसच्या वेळी पक्ष फुटण्यापर्यंत वेळ आली नाही तरी गांधीजींचा जाहीर विरोध असलेली व्यक्ती निवडून येते ही घटना पक्षातल्या प्रस्थापित नेतृत्वाला हादरा देणारी असली पाहिजे.

१९३८ साली सुभाष अयशस्वी झाले तरी या उगवत्या पिढीच्या आकांक्षा, चळवळीसाठी रेटा निर्माण करतच होत्या. गरज पडल्यास घातपात, शस्त्रांचा उपयोग हे सर्व करण्याची तयारीही होती. आंतरराष्ट्रीय परिस्थिती लक्षांत घेता चळवळ करण्याची ही योग्य वेळ नव्हे, केल्यास निष्कारण शक्तिव्यय होईल असा गांधीजींचा विचार दिसतो. देशव्यापी चळवळ

अनुक्रमणिका






गांधीजींनी उद्‌घोषित केल्याशिवाय तिला उधाण येणार नाही, पण गांधीजी चळवळीला अनुकूल होत नाहीत याचे ताण पक्षात जाणवत असले पाहिजेत. एका मर्यादेपर्यंत हे ताण पक्षाच्या अंतर्गत व्यवस्थेत पचवता येतात. मात्र या मर्यादेपलीकडे हे ताण साचू देणे म्हणजे स्फोटक परिस्थितीला आमंत्रणच. १९३८ साली पक्ष वाचला, पुन्हा तशी परिस्थिती निर्माण होणे प्रस्थापित नेतृत्वाला परवडणार नव्हते. म्हणून वाफ कोंडू द्यायची नाही या व्युहरचनेत 'वैयक्तिक सत्याग्रह' या धोरणाचा अवलंब झाला.

वैयक्तिक सत्याग्रहाचे नियम, आखणी, अंमलबजावणी यांचे तपशील ज्ञात आहेत. ते पुन्हा इथे मांडण्याची गरज नाही. या कार्यक्रमाचा उद्देशच काहीतरी चळवळ सुरू आहे असे चित्र जनतेला दिसावे, पण फारसे मोठ्या प्रमाणावर काही घडू नये असा होता. पक्षातल्या तरुण गटाला एका मर्यादेनंतर याचे आकर्षण वाटणे शक्य नव्हते. व्यापक चळवळीचा रेटा, त्यासाठी घातपात-शस्त्र वापरण्याची तयारी हे स्फोटाच्या बिंदूकडे जात आहे – जर वाव दिला नाही तर नेतृत्वाला बाजूला सारून चळवळ सुरू होईल आणि पक्ष हातातून निसटेल या भावनेपायी '४२' घोषित करणे भाग पडले असावे. त्यामुळेच पूर्वतयारी, आघाडी, कार्यक्रम, तडजोडीचा टप्पा असे काहीच न ठरता 'करा वा मरा' या स्वरूपात आंदोलन घोषित झाले.

गोवालिया टँकवर आंदोलन घोषित होताच बरेच नेते तुरुंगाआड करण्यात आले. तोडफोड-बाँबस्फोट, रुळमार्ग विस्कटणे, असे 'अहिंसे'च्या परिघात न बसणारेही प्रकार झाले. जमले त्यांनी पकडले न जाता भूमीगत राहून आंदोलन रेटले खरे, पण महायुद्ध सुरु असताना ब्रिटिशांना अराजक परवडण्यासारखे नव्हते. ४२च्या आंदोलनात वैयक्तिक साहसाच्या रोमांचित करणाऱ्या घटना अनेक आहेत पण समग्र भारताचे चित्र पाहिले तर पहिला उमाळा संपताच आंदोलन दडपून टाकणे ब्रिटिशांना सहज शक्य झाले. फार काळ आंदोलन चालू शकले नाही. अपुऱ्या तयारीचा हा परिणाम असावा. सोबत समाजातले आर्थिक चित्रही अनुकूल नव्हते. १९२९ पासून सुरु असलेल्या जागतिक मंदीचे परिणाम तत्कालीन भारतीय उद्योगजगताने भोगले आहेत. याची पार्श्वभूमी दांडी मीठ सत्याग्रह आंदोलनाला आहे. मात्र ७-८ वर्षे मंदीचे चटके सोसलेल्यांना १९३७ पासून पुन्हा उद्योगजगत भरभराटीकडे आल्यामुळे थोडे आर्थिक स्वास्थ्य आले होते. त्याचाही काही परिणाम संभवतो.

'भारत छोडो' आंदोलनातले सर्व 'हिरो' हे डाव्या विचारांचे असल्याचे सहज लक्षांत येते. जयप्रकाश, लोहिया, पटवर्धन बंधू, अरुणा असफअली, नाना पाटील, एसेम ..... अशी नावे पुष्कळ नोंदवता येतील. या नव्या पिढीच्या, समाजवादी विचारांच्या प्रवाहाच्या दडपणाचा निचरा झाला नाही तर पक्ष हातातून जातो, अशा परिस्थितीच्या आकलनातून प्रस्थापित नेतृत्वाने 'छोडो भारत' घडू दिले असे जाणवते. ही प्रक्रिया स्वातंत्र्यानंतरही कार्यरत राहीली.

भारताच्या लांबलचक स्वातंत्र्य आंदोलनांत असंख्यांनी अपार त्याग केला. हे आंदोलन सशस्त्र व निःशस्त्र अशा दोन्ही प्रकारांत लढले गेले. '४२' हा त्या वाटचालीतला एक महत्त्वाचा टप्पा आहे यांत संदेह नाही. '४२' धरून या संपूर्ण स्वातंत्र्य आंदोलनांत आपले स्वास्थ्य, स्थैर्य, प्रसंगी प्राण उधळून देणारे सर्वजण वंदनीय आहेत. पक्ष ताब्यांतून जाऊ नये म्हणून, परिस्थितीच्या दडपणाखाली प्रस्थापित नेतृत्वाने आंदोलन छेडले असे म्हणताना या ज्ञात-अज्ञात स्वातंत्र्ययोद्ध्यांपैकी कुणाचाही अधिक्षेप करण्याचा हेतू नाही. राजकारणाची वाटचाल ही नागमोडीच असते याला कुणाचाच इलाज नसतो. ही नागमोडी वळणे बेचाळीसच्या आंदोलनामागेही असू शकतात. अशी वळणे शोधतच इतिहासाचे संदर्भ समग्रपणे हाती येतात. त्या दृष्टीने हा एक प्रयत्न, इतकेच.

⌘⌘

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




